# नवभारत

फेब्रुवारी २००८






## तटस्थ योगी...

मध्ययुगीन आत्मगौरवी इतिहासाच्या
वर्तुळात फिरणाऱ्या
महाराष्ट्रीय शोधबुद्धीला
बाहेर काढून
वर्तमानात आणणारा...

आधुनिक इतिहास लेखनास
प्रतिष्ठा प्राप्त करून देणारा...

समभावी संशोधक.






अनुक्रमणिका

मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई




नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**
**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६१ । अंक ५ । फेब्रुवारी २००८
पौष/माघ शके १९२९
वार्षिक वर्गणी २०० रुपये.
या अंकाची किंमत रु. २०/-

या अंकातील लेखांत व्यक्त झालेल्या मतांशी संपादक व प्राज्ञपाठशाळा मंडळ सहमत असतीलच, असे नाही.

## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोनानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्य-निष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

---

* नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै० शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.

**प्राज्ञपाठशाळामंडळ**
**अध्यक्ष व विश्वस्त :**
सरोजा भाटे

**संपादक :**
श्री. मा. भावे

**संपादक मंडळ :**
वसंत पळशीकर, सुधीर रसाळ,
सीताराम रायकर, यशवंत कळमकर

प्राज्ञ पाठशाळा मंडळ
वाई
२०/२/०८
ग्रंथालय

**संपादकीय पत्रव्यवहार :**
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
घ. वा. जोशी
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियत-कालिकाला अनुदान दिले असले तरी या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्य शासन सहमत असेलच, असे नाही.

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# नवभारत

फेब्रुवारी २००८

## अनुक्रमणिका





मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# प्रा० य० दि० फडके : अभ्यासक आणि माणूस

## सदानंद मोरे

गेल्या शतकातील ऐंशीच्या दशकाच्या सुरुवातीची ही गोष्ट आहे. विश्राम बेडेकर यांचे 'टिळक आणि आगरकर' नावाचे नाटक रंगभूमीवर आले होते. मी तेव्हा अहमदनगर येथील 'न्यू आर्टस्, कॉमर्स ॲण्ड् सायन्स कॉलेज' मध्ये तत्त्वज्ञानाचा व्याख्याता म्हणून काम करीत होतो आणि लाल निशाण पक्षाच्या 'श्रमिक विचार' नावाच्या दैनिकातून नियमितपणे लेखन करीत होतो. मला बेडेकरांचे हे नाटक आवडले नाही याचे कारण त्यांनी त्यात (आपण आगरकरांचे चाहते आहोत असे म्हणत) आगरकरांवर अन्याय केला होता. इतिहासाचा विपर्यास केला होता. मी नाटकाची समीक्षा करणारा लेख 'श्रमिक विचार'च्या रविवारच्या अंकात लिहिला.

बेडेकरांचे हे नाटक डॉ. य. दि. फडके यांनाही नेमक्या अशाच कारणासाठी आवडले नव्हते. माझा लेख त्यांच्या वाचनात आला. त्यांनी ज्या प्रकारचे युक्तिवाद समकालिन अस्सल साधनांच्या आधारे केले होते त्याच प्रकारचे युक्तिवाद मी काहीसे अहिताग्नी राजवाड्यांच्या आत्मकथेच्या आधारे व बरेचसे कल्पनाशक्तीच्या बळावर मधल्या कोन्या जागा भरून काढीत केले होते. फडक्यांनी माझी चौकशी केली व त्यांना साश्चर्य कौतुक वाटले. त्यांनी मला बोलावून घेऊन माझ्याशी चर्चा केली व मला प्रोत्साहनही दिले.

दरम्यान फडक्यांनी आधुनिक महाराष्ट्राचा इतिहास लिहिण्याचा बृहत् प्रकल्प हाती घेतला होता. त्याची सुरुवातीची संकल्पना अनेक अभ्यासकांनी एकत्र येऊन करण्याची होती. फडक्यांनी मला पत्र लिहून मी त्यात सहभागी होऊ शकेन काय याची विचारणा केली. त्यात त्यांनी माझे वाचन चौफेर व सूक्ष्म असल्याचे म्हटले होते. ही एक मोठीच शाबासकी होती. मी अर्थातच सहर्ष होकार कळविला. अर्थात काही कारणांमुळे हा प्रकल्प या प्रकाराने साकारला नाही हा भाग वेगळा. पण त्यामुळे काही बिघडलेही नाही. फडक्यांनी तो एकट्याच्या हिंमतीवर पूर्ण केला. फडक्यांचा हा आदर्श पुढे ठेवायचे मी तेव्हाच ठरवले. 'लोकमान्य ते महात्मा' हा आंतरविद्याशाखीय प्रकल्प मी एकट्याने सिद्ध केला तेव्हा मी "अनेक अभ्यासकांनी एकत्र येऊन करायचे कार्य एकट्याने पार पाडले ही बाब खचितच गौरवास्पद आहे" असे फडक्यांनी लिहिले. त्यांचे वाक्य माझ्यासाठी एखाद्या मोठ्या पुरस्काराच्यापेक्षा मोठे होते.

फडके यांच्या संशोधन कार्याबद्दल मला वाटत असलेल्या आदराची कारणे दोन. पहिली गोष्ट म्हणजे मध्ययुगीन आत्मगौरवी इतिहासाच्या वर्तुळात फिरणाऱ्या महाराष्ट्रीय शोधबुद्धीला बाहेर काढून वर्तमानात आणले आणि आधुनिक इतिहास लेखनास प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. दुसरे असे की, महाराष्ट्रातील अत्यंत महत्त्वाच्या अशा ज्या ब्राह्मणेतर चळवळीकडे अभ्यासकांनी कानाडोळा करून तिला जणू इतिहासाच्या बाहेर ठेवले होते, तिला आपण अभ्यास लेखनाचा विषय बनवले. खरे तर फडक्यांना हा उद्योग करायची गरज नव्हती. किंबहुना त्यांच्या जातीचा विचार केला असता त्यांनी तो न करणे मनुष्य स्वभावाला धरून झाले असते. परंतु फडके हे जातीचे उल्लंघन करून 'डी कास्ट' झालेले ब्राह्मण होते. असा अव्यापारेषु व्यापार केल्याबद्दल त्यांनी एका बाजूस स्वजातीयांचा रोष तर पत्करलाच परंतु दुसऱ्या बाजूला पुरावा वा निष्कर्ष ब्राह्मणेतरांच्या सोयीचे नसत तेव्हा ते तितक्याच परखडपणे पुढे ठेवल्यामुळे त्यांच्या नाराजीसही तोंड दिले. जातिनिष्ठ समाजात 'सत्य आम्हा मनी। नव्हो गाबाळाचे धनी' या तुकारामी बाण्याने बोलणे हे तलवारीच्या पात्यावरून चालण्यासारखे आहे. पण फडके आयुष्यभर तसेच चालत आले.

ब्राह्मणेतर चळवळीच्या दुर्लक्षित इतिहासाकडे लक्ष वेधून फडक्यांनी जी कामगिरी केली तिला मी त्यांचे मुख्य योगदान मानतो. (इतर विषय हाताळणारे अभ्यासक पूर्वी होते, आताही आहेत व पुढेही होतील.) फुले



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

भालेकरादी सत्यशोधकांचा शोध घेऊन फडके शाहू छत्रपतींकडे वळले. शाहूंचा शोध टिळकांच्या संदर्भात घेऊन त्यांनी एक पद्धतिशास्त्रीय औचित्यही तर साधलेच, परंतु शाहूभक्त आणि टिळकभक्त यांनी केलेली अनाठायी उदात्तीकरणे टाळूनही त्यांनी त्या दोघांनाही योग्य तो न्याय दिला. इतिहासलेखनासाठी आवश्यक असलेला 'ताटस्थ्ययोग' त्यांनी साधला असल्यामुळे त्यांना 'तटस्थ योगी' म्हणायला हरकत नसावी.

शाहू छत्रपतींनंतरचे महत्त्वाचे ब्राह्मणेतर नेते म्हणजे केशवराव जेधे आणि दिनकरराव जवळकर. परंतु केशवरावांचे चरित्र तर त्यांचेच राजकीय लाभार्थी विसरलेले आणि जवळकरांवर ब्रह्मद्वेष्टा असा शिक्का बसल्यामुळे त्यांचे साहित्य विस्मृतीच्या गर्तेत गेलेले. फडक्यांनी केशवराव जेधे यांचे चरित्र लिहिले व डॉ. बाबा आढावांच्या मदतीने जवळकरांचे समग्र साहित्यही संपादित करून प्रसिद्ध केले. केशवराव हे यशवंतराव चव्हाणांचे एके काळचे राजकीय प्रतिस्पर्धी असल्यामुळे यशवंतरावांना या चरित्रात स्वारस्य तर होतेच परंतु फडक्यांच्या हेतूबद्दल संशयही होता. त्यांनी प्रकाशक मधुकाका कुलकर्णी यांच्याकडून या चरित्राचे फॉर्म्स जसजसे छापून झाले तसतसे मागून घेऊन वाचले.

जवळकरसाहित्याचा पुनरुद्धार बऱ्याच ब्राह्मणांना आवडला नाही, तसा तो खुद्द यशवंतरावांनाही आवडला नव्हता. जवळकरांच्या या पुस्तकाच्या प्रकाशनाच्या दिवशी यशवंतराव नेमके पुण्यातच होते. जवळकर वाङ्मयातून 'देशाचे दुश्मन' हे टिळकांवर जहाल टीका करणारे पुस्तक वगळले जावे अशी त्यांची इच्छा होती. प्रकाशनाच्या अगोदरच्या दिवशी साहेब अहमदनगर येथे अप्पा लबडे या तरुण कवीच्या कवितासंग्रहाच्या प्रकाशनासाठी आले होते. तेव्हा झालेल्या चर्चेत त्यांनी 'देशाचे दुश्मन' विषयीची नाराजी माझ्याकडे बोलून दाखवली व या कारणामुळे आपण प्रकाशनास जाणार नसल्याचेही सांगितले. माझ्या समजुतीप्रमाणे त्यांनी आपली इच्छा फडक्यांपर्यंत (व बहुधा बाबापर्यंतही) पोहचवली सुद्धा होती. परंतु 'इतिहास' ही फडक्यांची पहिली व शेवटची निष्ठा असल्यामुळे ते बधले नाहीत.

ब्राह्मणेतर चळवळीचे इतिहास लेखन आणि त्यासाठी आवश्यक त्या साधनसामग्रीची जमवाजमव ही खरे तर फडके आणि आढाव यांच्या समता या मूल्यावरील निष्ठेतून घडलेली गोष्ट होती. त्याला इतरांनीही हातभार लावावा अशी त्यांची इच्छा होती. त्या अनुषंगाने माझ्याकडे महत्त्वाचे ब्राह्मणेतर पत्रकार बडोद्याचे जागृतिकार पालेकर यांच्या लेखनाचे संपादन करण्याची जबाबदारी आली व मी ती माझ्या मगदुराप्रमाणे पार पाडली. त्यामुळे माझे स्वतःचे महाराष्ट्रेतिहासाचे आकलन समृद्ध होत गेले व त्यातूनच महाराष्ट्राच्या सांस्कृतिक इतिहासाची तुकाराम केंद्रित मांडणी करणारा 'तुकाराम दर्शन' हा ग्रंथ सिद्ध झाला. त्याच्या प्रकाशनासाठी फडक्यांपेक्षा अधिक योग्य व्यक्ती कोण असणार? त्या समारंभात बोलताना ग्रंथाला पुरस्कार भरपूर मिळतील पण त्यावर चर्चा कमी होईल असे भाकित फडक्यांनी केले व ते अगदी अचूक ठरले.

स्वतः सतत कार्यरत असलेले फडके इतरांनाही मदत करण्यात तत्पर असत. दुसऱ्या कोणाऐवजी मी माझेच उदाहरण देईन. डॉ. रा. चि. ढेरे यांनी पंढरपूरची सध्याची विठ्ठलमूर्ती आद्य नसून आद्य मूर्ती माढा येथे असण्याचा दावा केला होता. त्यांच्या 'केसरी' मधील यासंबंधीच्या लेखात ज्या साधनांचा निर्देश केला होता ती मुंबईच्या आर्काइव्ज मध्ये होती. तेथे प्रवेश करण्यासाठी एखाद्या अभ्यासकाने रुजवात करून देणे आवश्यक असायचे. फडक्यांनी जातीने तेथे येऊन माझा रीतसर परिचय वगैरे तर करून दिलाच, परंतु माझ्या मुक्कामाची सोय आपल्या निवासस्थानी केली. 'साहित्य सहवास' मधील अभ्यासक आणि माणूस या दोन्ही नात्यांनी फडक्यांच्या ऋणातून उतराई होणे अवघडच आहे. 'लोकमान्य ते महात्मा' हा ग्रंथ त्यांना अर्पण करून मी हे काम अंशतः का होईना, केले आहे.

फडक्यांचे बरेचसे लेखन महाराष्ट्राविषयी व मराठीतून असले तरी तो केवळ त्यांचा स्वतःच स्वतःवर सोयीसाठी घालून घेतलेल्या मर्यादांचा भाग होता. त्यांनी एन. बी. टी. साठी इंग्रजीतूनही पुस्तके लिहिली आणि सुभाषबाबूंवरील द्विखंडात्मक पुस्तक त्यांच्या आकलन-क्षमतेची आणि अन्वयार्थप्रवणतेची साक्ष पटवण्यास समर्थ

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आहे. खरे तर भारतीय पातळीवरील राजकारणाचा उत्तम व्यासंग असल्यामुळेच त्यांना महाराष्ट्राचे राजकारण नीट समजू शकले.

फडक्यांच्या लेखनाची व्याप्ती आणि भोवळ आणणारा झपाटा न सोसल्यामुळेच की काय, काही आस्ते कदम अभ्यासकांनी त्यांच्याकडे 'इंटरप्रिटेशन'चा भाग कमी असण्याची कुजबूज करून पाहिली होती. परंतु त्यात काही अर्थ नव्हता. एक तर आधुनिक इतिहासात मुळात 'फॅक्ट्स्'च्या स्वरावरील कामच पुरेसे झाले नाही तेव्हा या क्षेत्रात जो पहिल्यांदा काम करणार त्याला आपली शक्ती व वेळ साधनांची जमवाजमव करून 'फॅक्टस्'ची संगतवार मांडणी करण्यात खर्च करावा लागणार हे उघड आहे. पण मुळात अशी जमवाजमव व मांडणी करण्यासाठी जी पक्की सैद्धांतिक बैठक असावी लागते ती त्यांच्याकडे होती. दुसरे असे की, वाचकांपुढे पुरेशा 'फॅक्टस्' ठेवणे हे ते अभ्यासकाचे कर्तव्यच समजत. तसे केले म्हणजे सैद्धांतिक शेरेबाजीचा फाफटपसारा माजवण्याची गरज भासत नाही. वस्तुस्थितीचे पुरेसे विवेचन केल्यानंतर फडके त्यांचा अन्वयार्थ सांगताना जो सैद्धांतिक शेरा मारीत तो विलंबित लयीत गाणाऱ्या गायकाने तालाचा तोल सांभाळीत झपकन समेवर यावे तसा असायचा.

आपल्या लेखनाचा विषय झालेल्या पात्रांकडे फडके समभावाने पाहात. अमुक एकास महानायक ठरवून इतरांना खलनायक ठरवणे वा एकाचे दैवतीकरण करत दुसऱ्याचे दैत्यीकरण करणे त्यांनी कधीच पसंत केले नाही. आगरकर, सेनापती बापट आणि र. धों. कर्वे यांच्याबद्दल त्यांच्या मनात एक कोवळा कोपरा असल्याचे म्हटले जाते, तरी फडक्यांनी त्यांचे उदात्तीकरण कधीच केले नाही. त्यांच्याकडे त्यांनी माणूस म्हणूनच पाहिले. र. धों. च्या विचारविश्वाचा वेध घेताना त्यांनी त्यांच्या बुद्धिवादाच्या मर्यादाही तितक्याच काटेकोरपणे दाखवून दिल्या.

एरवी इतिहास लेखनात मग्न असणाऱ्या फडक्यांनी वर्तमानाशी असलेल्या बांधिलकीतून येणारी जबाबदारी कधीच टाळली नाही. ही जबाबदारी पार पाडताना उद्भवलेल्या वादांना ते समर्थपणे सामोरे जात राहिले. वर्तमान राजकारणाची व राजकारण्यांची त्यांनी परखड समीक्षा केली. सीमाप्रश्नाची सोडवणूक करण्यासाठी महत्त्वाचे योगदान दिले. डॉ. आंबेडकरांचे प्रतिमाभंजन करण्यासाठी सरसावलेल्या अरूण शौरींना त्यांनी रोखले. पण या विध्वंसक वा नकारात्मक गोष्टींबरोबर साहित्य संस्कृती मंडळाचे अध्यक्षपद सांभाळताना त्यांनी रचनात्मक वृत्तीचीही झलक दाखवली.

मोठ्या माणसांच्या मृत्यूनंतर पोकळी निर्माण होते असे म्हटले जाते तशी ती फडक्यांच्या निधनामुळेही झालेली आहे. पण ही पोकळी कशी भरून काढायची याचे नेमके मार्गदर्शन फडक्यांच्या लेखनातूनच पुरेसे मिळते. प्रश्न आपण ती भरून काढणार आहोत की, परत नेहमीप्रमाणे जातीय, धार्मिक, पक्षीय पूर्वग्रहांना कवटाळून फडकेपूर्व युगात पुन्हा मागे जाणार आहोत हा आहे.

✠✠✠



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# 'लोकमान्य ते महात्मा' च्या निमित्ताने : ब्राह्मण-ब्राह्मणेतर वाद

## लेखांक पहिला

### श्री० मा० भावे

The bourgeoisies .... draws all, even the most barbarian nations into civilisation. It compels all nations, on pain of extinction, to adopt the bourgeois mode of production; it compels them to become bourgeois themselves. In one word, it creates a world after its own image.

- Communist Manifesto.[1]

पश्चिम युरोपातील देशांच्या उत्कर्षाला १६ व्या शतकात सुरुवात झाली. सन १४९२ मध्ये कोलंबसाने वेस्ट-इंडीज बेटे व अमेरिका खंड यांचा शोध लावला, तर सन १४९८ मध्ये वास्को डी गामाने हिंदुस्थानाला जाण्याचा सागरी मार्ग शोधून काढला. १६ व्या शतकाच्या उत्तरार्धात अमेरिका खंडातील (व वेस्ट इंडीज बेटातील) आदिवासींचा सर्वनाश करून युरोपीय लोकांनी त्या खंडातील जमीन व खनिजसंपत्ती यांच्यावर ताबा मिळविला आणि सोन्या-चांदीचे प्रचंड साठे हस्तगत केले. (उदा. १५४६ पासून १६०० सालापर्यंत १४४ कोटी पौंड चांदी अमेरिकेतून युरोपात गेली.) १६२० सालापासून इंग्लंडने उत्तर अमेरिकेत व वेस्ट इंडीज बेटात वसाहती स्थापन केल्या. तेथील कष्टाची कामे करण्यासाठी आफ्रिकेतून काळे लोक गुलाम करून अमेरिकेत पाठवण्यात आले. तेथून पुढे अमेरिका, वेस्ट इंडीज व इंग्लंड या त्रिकोणात व्यापाराला बरकत आली आणि इंग्लंडमध्ये संपत्तीचे ओघ वाहू लागले.

कसबी कारागिराने आपल्या घरी हस्तकौशल्ये व प्राथमिक स्वरूपाची अवजारे वापरून वस्तू निर्माण करायच्या, ही १६ व्या शतकातील युरोपात उत्पादनाची पद्धती होती. पण व्यापाऱ्यांजवळील पैसा व त्यामुळे, मागणी वाढली तेव्हा व्यापाऱ्यांनी उत्पादनावर नियंत्रण मिळविण्याचे ठरविले आणि कारागिरांच्या टोळ्या करून व वस्तूच्या उत्पादनाच्या एकेका टप्प्यावर एकेका टोळीला काम करण्यास बसवून त्यांनी उत्पादनाचे प्रमाण अनेक पटींनी वाढविले. मार्क्स यालाच 'भांडवली हस्तोत्पादन' (मॅन्युफॅक्चर) असे म्हणतो. १८ व्या शतकाच्या उत्तरार्धात यंत्रोत्पादनाला सुरुवात झाली. प्रथम वस्त्रोद्योगात सूत काढणे व त्याचे कापड विणणे यासाठी यंत्रांचा वापर झाला. या यंत्रांची सुधारणा पुढील पन्नास वर्षे चालू होती. १९ व्या शतकाच्या सुरुवातीला वाफेवर चालणारी जहाजे व आगगाडीची इंजिने वापरात आली. व्यापार वेगाने होऊ लागला.

उत्पादन व दळणवळण यात झालेल्या बदलांमुळे वाणिज्यात अतोनात वाढ झाली. वस्तु-विनिमयाने होणारी देवाण-घेवाण संपुष्टात आली व पैशाच्याद्वारे बहुतेक व्यवहार होऊ लागले. बँका, विमा कंपन्या, समभागावर आधारलेले उद्योग व समभागांची खरेदी-विक्री यांची वाढ झाली; पैसा भूमिति-श्रेणीने फुगत गेला. भांडवलशाही उत्पादन, ते उत्पादन बाजारपेठेत आणणे, त्या उत्पादनाची विक्री, त्यापासून मिळणारा नफा व नफ्यामुळे होणारी भांडवलातील वाढ या आकाशापर्यंत उभारत जाणाऱ्या वावटळीतून नवी अर्थव्यवस्था उभी राहिली व १८ व्या शतकाच्या अखेरीला परमोत्कर्षाला पोचली. शेतीवर चरितार्थ करणारी फार मोठी लोकसंख्या पांढरेपेशा उद्योगातून पैसे मिळवू लागली.

भांडवलशाही बळावली तसतसे माणसा-माणसातील भाबडे (आयडिलिक), खानदानी (पेट्रियार्कल) आणि सरंजामी (फ्यूडल) संबंध मोडीत निघाले. सरंजामदार व त्यांचे जोडीदार असणारे धर्मगुरू यांनी निष्ठा, श्रद्धा व पारलौकिकाविषयींच्या कल्पना यांचा भूलभुलैया रचून आर्थिक व्यवहारातील शोषित-शोषक-भावावर सोज्वळ मुखवटे चढवले होते, पण भांडवलशाही

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अर्थरचनेने मध्ययुगीन अर्थरचनादेखील शोषणावरच आधारलेली होती हे स्पष्ट केले. अखेर माणसे सामाईक हितसंबंध आणि रोख रकमेची देवाण-घेवाण अशा रोकड्या गोष्टींसाठीच एकत्र येतात, असा भांडवली युगाचा धर्म आहे, असे सांगितले जाऊ लागले.

सरंजामदारी युगात उत्पादन-पद्धती, बाजारपेठा, व्यापार यात वर्षानुवर्षे कोणताच बदल होत नसे. सारे आर्थिक जीवन चाकोरीबद्ध होते आणि या स्थिरतेमुळेच सरंजामदारी समाज टिकून होता. पण भांडवलशाहीत नवीन तंत्रज्ञानाचा शोध व अभ्यास सतत चालू असतो, बाजारपेठांचा विस्तार होतो, वाणिज्य वर्धिष्णू असते आणि अर्थकारण गतिमान राहाते. या अर्थकारणावर समाजरचना आधारलेली असल्याने भांडवली समाजात सतत उलथा-पालथ होत राहते. त्यामुळे माणसे कायम असुरक्षिततेची धास्ती बाळगतात आणि सुरक्षिततेच्या हव्यासापायी पैसा मिळविण्याच्या मागे लागतात.

मार्क्स व एंगल्स हे भांडवलशाहीचे कठोर टीकाकार होते खरे; पण भांडवलशाही जेव्हा समाजाला सरंजामशाहीच्या दडपणाखालून मुक्त करीत होती तेव्हा ती सुद्धा एक पुरोगामी व क्रांतिकारक शक्ती होती याची त्यांना पूर्ण जाणीव होती. आपले क्षेत्र सतत विस्तारत राहायचे, जगाच्या कानाकोपऱ्यात पोचायचे व तेथील मागास समाजांना भांडवलदारी अर्थरचनेच्या कह्यात आणायचे ही भांडवलशाहीची झेप त्या दोघांना आकर्षक वाटत होती. 'कम्युनिस्ट मॅनिफेस्टो'चे काही परिच्छेद वाचताना आपण भांडवलशाहीचा स्तुतिपाठच वाचत नाही ना, असे वाटते.

मार्क्स भांडवलशाहीतील शोषणाकडे लक्ष वेधीत होता; पण १९ व्या शतकाच्या सुरुवातीला असेही विचारवंत होते की, जे विज्ञान-तंत्रज्ञानाची प्रगती आणि श्रीमंतीची लयलूट यांनी दिपून जाऊन भांडवलशाहीला मनुष्याच्या उत्क्रांतीतील सर्वोच्च टप्पा मानीत होते. कोंट (१७९८-१८५७) हा अशा विचारवंतांचा मुख्य होता. कोंट सांगत असे की, सरंजामदारी कालखंडात आध्यात्मिक (स्पिरिच्युअल) व ऐहिक अशी स्वतंत्र क्षेत्रे मानून त्यावर अनु. चर्च व राजसत्ता यांचे नियंत्रण होते. नव्या युगात आध्यात्मिक विचारावर शास्त्रज्ञांची छाप पडलेली असेल व ते ईश्वरासारख्या कपोलकल्पिताचा आधार न घेता वैज्ञानिक सत्यांचा उपयोग करून समाज-जीवनाला दिशा देतील, सार्वत्रिक शिक्षण आणि सुयोग्य कायदे यांचा उपयोग करून समाजातील सर्व घटकांना न्याय मिळेल अशी व्यवस्था ठेवतील.[९] कोंटच्या विचारांचा जॉन स्टुअर्ट मिल (१८०६-१८७३) या ब्रिटिश विचारवंतावर मोठा प्रभाव पडला. मिल हा ईस्ट इंडिया कंपनीत नोकरीला होता. त्याची अशी धारणा होती की, भारतीय समाज हा अज्ञान, अंधश्रद्धा, वेडगळ धर्म, रानटी चालीरीती यांच्या विळख्यात सापडलेला मनुष्य-समूह आहे. शिक्षण व सुयोग्य विधिनियम यांच्या सहाय्याने या समाजाला इतिहासाच्या मुख्य प्रवाहात - म्हणजे भांडवलशाही विकासाच्या मार्गावर - आणून सोडणे हे ब्रिटिश साम्राज्याचे उद्दिष्ट असले पाहिजे. मिलच्या शिकवणीने भारलेले इंग्रज इथे येत ते याच समजुतीत की, एक उच्च दर्जाची संस्कृती, एक श्रेष्ठ धर्म आणि उत्तम नीतिमत्तेचे संचित घेऊन आपण आलो आहोत व इथल्या समाजाचा उद्धार करणे हे आपले कर्तव्य आहे.[१०]

भांडवलशाहीच्या या टप्प्यावर व्यक्तिस्वातंत्र्य हे समाजव्यवस्थेचे सूत्र होते. गोत, पंथ, प्रदेश, आश्रयदाता अशा प्रकारची टरफले सोलून काढून व्यक्तीने आपल्या निखळ कौशल्याच्या आधारावर बाजारपेठेत आपली किंमत ठरवून घ्यावी; व्यक्तीला विकासाची साधने उपलब्ध असावीत यासाठी तिला संपत्ती कमावणे, ती राखणे व तिची वासलात लावणे याचे स्वातंत्र्य असले पाहिजे; कोणताही विचार करणे, तो व्यक्त करणे व त्याच्या प्रसारासाठी संघटना बांधणे यांचीही मोकळीक व्यक्तीला हवी; व्यक्ती समाजासाठी नाही, समाजाने व्यक्तीच्या हिकमतींना वाव दिला पाहिजे. व्यक्तीच्या उन्नतीतून समाजाची उन्नती साधते, असा हा विचार होता. हे विचार भारतीय व्यक्तींना समजावून सांगणारे शिक्षण इंग्रज सरकार देणार होते. युरोपीय विज्ञान, तत्त्वज्ञान, इतिहास व वाङ्मय यांचे शिक्षण इंग्रजी भाषेतून भारतीयांना द्यावे असा निर्णय इंग्रज सरकारने १८३५ साली घेतला.






राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

(१)

सरंजामदारीत व्यक्ती-व्यक्तीनील संबंधामागील सूत्र हे असे की, 'अ' पेक्षा 'ब' हा सहजच किंवा ठरवून दिल्यामुळे श्रेष्ठ आहे; आणि त्यामुळे 'अ' ने 'ब' चे अंकित म्हणून राहणेही सहज किंवा ठरवून दिलेले आहे. भांडवलदारी युगाने सुधारणा केली असेल तर ती हीच की, अंकितपण असे निसर्गसिद्ध असत नाही; हितसंबंध व देवाण-घेवाण यातून ते ठरते व बदलतेही. परंतु, हे सर्व प्रत्यक्षात आणण्यासाठी युरोपात फार मोठी आर्थिक समृद्धी निर्माण व्हावी लागली. औद्योगिक सुधारणा, खेळता पैसा, असंख्य संधींची उपलब्धता यांच्या पाठिंब्याखेरीज ही भांडवलदारी सामाजिक सुधारणा शक्य झाली नसती. पैसा मिळवण्याची व आपल्या सुखात वाढ करण्यासाठी तो वापरण्याची चटक माणसांना लागली की, वर सांगितेल्या 'सहज श्रेष्ठत्वांच्या' सूत्रातून निर्माण होणारी अंकिततेची जळमटे माणसे फटकारून लावतात.

परंतु महाराष्ट्रात (व एकंदरीने भारतातही) इंग्रज राज्यकर्त्यांनी "आम्ही तुम्हाला प्रगतीच्या मुख्य प्रवाहात आणून सोडणार आहोत" असे कितीही घोळून सांगितले असले तरी त्या प्रवाहात जाण्याची मुख्य युक्ती जो औद्योगिक विकास तो होऊ देण्यास ते तयार नव्हते. आपल्याकडे बरीच विकास पावलेली हस्तोत्पादन व्यवस्था इंग्रजांनी उखडून टाकलीच पण त्या जागी जे यंत्रोत्पादन यायला हवे होते ते आणण्यात त्यांनी हात आखडता घेतला. याचा अर्थ असा नाही की, इंग्रजांनी येथे नवीन उद्योगधंदे अजिबातच येऊ दिले नाहीत. त्यांना ज्या उद्योगांची निकड भासली ते त्यांनी इथे उभे केले. रेल्वे, तारयंत्र, पोस्ट, बांधकाम खाते यांची राज्यकारभारासाठी गरज होती. कापूस, नीळ, चहा व कॉफी अशी नगदी पिके व्यापाराला उपयोगी होती. वस्त्रोद्योग, खाद्य किंवा उद्योग यासाठी लागणारे तेलाचे कारखाने, साखरेचे कारखाने, टाटांचे लोखंडाचे कारखाने, धातु-उद्योग असे भारतीय भांडवलाने उभारलेले उद्योग त्यांनी चालू दिले. पण या तुटपुंज्या औद्योगिकरणातून श्रीमंतीची जी लाट यायला हवी होती, जी युरोपात - विशेषतः इंग्लंडमध्ये - आली होती, ती काही आली नाही. सर्व अर्थव्यवस्था जखडल्या अवस्थेत घुसमटत राहिली.

इतक्यानेच भागले नाही. राजकीय फायद्यासाठी सरंजामदारी युगाचे अवशेष जतन करून ठेवण्याचे काम इंग्रजांनी चोखपणे केले. हिंदुस्थानात सुमारे पाचशे साठ संस्थाने इंग्रजांनी सांभाळली. बंगाल, उत्तर प्रदेश, बिहार, मध्यप्रदेश, वऱ्हाड-नागपूर या भागात कायमधारा पद्धती चालू करून इंग्रजांनी जमीनदारीला उत्तेजन दिले. धर्मात ढवळा-ढवळ करायची नाही असे आश्वासन देऊन अव्वल इंग्रजीत कायदेकानूंना जो पुरोगामित्वाचा झोक होता तो त्यांनी गुलदस्त्यात टाकला. सक्तीचे व मोफत प्राथमिक शिक्षण देण्याला त्यांनी सतत विरोध केला. निवडणुकीत मतदार होण्यासाठी जे निकष निवडले त्यातून शिक्षणाची शर्त कटाक्षाने बाजूला ठेवली. अशा अनेक गोष्टी सांगता येतील की, ज्यावरून एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीला व विसाव्या शतकाच्या सुरुवातीला इंग्रजी राज्य हेच भांडवलदारी प्रगतीच्या मार्गातील धोंड बनून राहिले होते.

एकोणिसाव्या शतकात इंग्रजांनी इथे पाश्चात्त्य विज्ञान, वाङ्मय, समाजशास्त्रे, कायदा इत्यादींचे शिक्षण इंग्रजी भाषेतून देण्यास सुरुवात केली. त्यातून "एक नवाच वर्ग इथे अस्तित्वात आला. संस्थानिक, जहागिरदार यांचा रईस वर्ग आणि गोरगरिबांचा कनिष्ठ वर्ग यांच्या मध्ये या वर्गाचे स्थान आहे. दिवसागणिक या वर्गाचा प्रभाव वाढतो आहे व ही नव्या युगाची नांदी आहे. हा मध्यमवर्ग जिथे जिथे उदयाला आला तिथे तिथे स्वातंत्र्याची पावले उमटली अशी इतिहासाची साक्ष आहे. उज्ज्वल भविष्याची ग्वाही देणारे आजच्या काळात जर काही असेल तर तो हा वर्गच होय", या शब्दात राजा राम मोहन रॉय यांनी या वर्गाचे स्वागत केले.[४] ही १८२९ सालातली गोष्ट त्यानंतर ५० वर्षांनी विष्णुशास्त्री चिपळूणकरांनी 'एकंदरीत पाहता आतल्या शरीर-प्रकृतीला काही धक्का पोचला आहे, असे आम्हास वाटत नाही', असे खडखडीत सांगताना एक पुरावा म्हणून 'इंग्रजी विद्येचे अध्ययन आमच्या लोकांनी किती जलद केले' हा दाखला दिला आहे.[५] याच्या पुढच्या पिढीतील प्रा. म. शि. गोळे यांनी या नवशिक्षित वर्गाविषयी म्हटले आहे, "वीस वर्षापूर्वी जेव्हा अशाच (पक्षीः नवशिक्षित) विद्वानांचा समाजात भरणा होऊ लागला

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

होता, तेव्हा या समाजास उफळी येते की काय, असे वाटत होते. नव्या नव्या चळवळी सुरू होत होत्या, नवीन नवीन समाजहिताचे प्रश्न वादविवादात येत होते. जुन्यांच्या किंवा नव्यांच्या चित्तात शांतता किंवा समाधान नव्हते."[६]

परंतु नवशिक्षितांच्या पहिल्या दोन तीन पिढ्यांना वाटलेली ही उभारी, नवीन विचारांचा जोम व आत्मविश्वास १९ व्या शतकाच्या अखेरीला पार खुरटून गेला होता. 'सर्व प्रकारचे स्वातंत्र्य असून कल्पना व विचार यांचे वैचित्र्य नष्ट व्हावे, आचार व उद्योग यात फरक पडत जाऊ नये, केवळ निरर्थक पिष्टपेषणात व चर्चित-विषयात सुशिक्षितांचा सर्व वेळ जावा, याहून अधिक शोचनीय स्थिती ती कोणती?'[७] असा प्रा. गोळयांचा अनुभव आहे. यानंतर १५-१६ वर्षांनी ज्ञानकोशकार केतकरांनी पुण्यातील (सुशिक्षित व ब्राह्मण) लोकांविषयी असेच निरीक्षण नोंदवले आहे. 'आज अत्यंत आळशी, साहसशून्य, हातपाय न हालविणारे व जेठा मारून बसून देशोद्धाराच्या अगर वेदान्ताच्या गप्पा मारणारे कर्तव्यशून्य लोक जर कोठे सापडत असतील तर ते पुणे शहरात होत.'[८]

केतकरांनी खट्याळपणाने आणि गोळ्यांनी भाबडेपणाने नवशिक्षितांच्या निष्कर्तृत्वाचा दोष नवशिक्षितांवरच ठेवला आहे. पण या निष्कर्तृत्वाचे मुख्य कारण साखळलेली अर्थव्यवस्था हे होते. भांडवलदारी विकासक्रमाप्रमाणे इथे नवीन उद्योग व सेवाक्षेत्रे निर्माण झाली असती तर शिक्षण व्यवस्थेतही नवनवीन अभ्यासक्रम तयार करून त्या त्या क्षेत्रातील सुशिक्षित नोकरवर्गाची गरज भागविली असती आणि या नवशिक्षितांना हुरूप आला असता व पराक्रमही दाखविता आला असता. नाही तरी या नवशिक्षितांनी शिक्षण मिळविण्यासाठी अतोनात कष्ट घेतले होते, अपमान सोसले होते व अर्धपोटी दिवस कंठले होते हे त्यांच्या आत्मचरित्रांवरून स्पष्ट होते आहेच. तेव्हा त्यांच्या कर्तृत्वशून्यतेची केवळ टवाळी करावी किंवा हळहळ वाटून घ्यावी, इतक्या पुरताच हा प्रश्न नाही. कुंठित अर्थव्यवस्थेत या कर्तृत्वहीनतेचे मूळ आहे. दारिद्र्य ही वस्तुस्थिती असते तशी मनोवृत्तीही असते. काम करण्याची संधी नाही. त्यामुळे मरगळ व मरगळीमुळे कामाचा हुरूप नाही, अशा चक्रात हा नवशिक्षित समाज सापडला होता. लो. टिळकांनी 'ब्राह्मण व त्यांची विद्या' या पुस्तकाचे परीक्षण करताना साम्राज्यवादी राजवटीने नवशिक्षित वर्गाला उत्कर्षाची संधी नाकारल्याचे स्पष्टपणे दाखवून दिले होते.

## (२)

राजा राममोहन रॉय स्वतः सरंजामदार होते हे त्यांच्या 'राजा' या किताबावरून स्पष्टच आहे. ते जातीने 'कुलीन ब्राह्मण' होते. या जातीच्या रिवाजाप्रमाणे त्यांना अनेक बायका होत्या. तथापि, १९ व्या शतकाच्या पहिल्या चरणात इंग्रजी राज्यकर्त्यांनी इथे भांडवलदारी विकासक्रमाला अनुसरून उत्क्रांत झालेले समाज-धारणे विषयीचे विचार आणले त्यांचे स्वागत करण्यात रॉय हेच आघाडीवर होते. सरंजामदारी पासून भांडवली विकासाकडे होणाऱ्या संक्रमणाच्या पहिल्या टप्प्याचे ते साक्षीदार होते. त्यामुळे त्यांनी नवशिक्षितांची 'जात' न मानता त्यांचा 'वर्ग' मानला. त्यानंतर सुमारे ७० वर्षांनी प्रा. गोळे यांनी नवशिक्षितांचा उल्लेख 'ब्राह्मण' असा केला. या उल्लेखाचा खुलासा करताना त्यांनी म्हटले की, "साधारणपणे 'ब्राह्मण' हा शब्द पांढरपेशे लोकांचा थोडक्यात उल्लेख व्हावा म्हणून योजिला आहे. देशस्थ, कोकणस्थ, कऱ्हाडे आणि सारस्वत ब्राह्मण, कायस्थ आणि पाठारे प्रभू दुसऱ्या शुद्ध विद्याव्यासंगी जाती असतील, त्या सर्वांचा ब्राह्मण या शब्दात समाहार केला आहे."[९] असे असले तरी ही वस्तुस्थिती होती की, उच्च शिक्षण घेणाऱ्यात द्राविड व सारस्वत ब्राह्मण फार मोठ्या संख्येने होते. त्या वेळच्या महाविद्यालयातील विद्यार्थ्यांची जातवारी पाहिली तर हे दिसून येते.

या नवशिक्षित ब्राह्मणांना नोकरीविना दुसरे चरितार्थाचे साधन नव्हतेच. सरकारी नोकरीतही प्रथम वर्गाच्या किंवा दुसऱ्या वर्गाच्या नोकऱ्यात यापैकी अगदीच थोडे लोक पोचत. १९११ सालच्या आकडेवारीनुसार मुंबई इलाख्यात ३३४ हिंदू राजपत्रित अधिकारी होते. त्यापैकी ब्राह्मण (चित्पावन + देशस्थ + कऱ्हाडे) फक्त १११ होते.



मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

बारा अधिकारी प्रभू आणि सोळा जण सारस्वत होते. (त्या काळी सारस्वत हे ब्राह्मणात गणले जात नसत व याची त्यांना चीड असे.) खरे तर संपूर्ण हिंदू अधिकाऱ्यांच्या जवळ जवळ दुप्पटीने ख्रिस्ती राजपत्रित अधिकाऱ्यांची संख्या होती.[१०] याचाच अर्थ असा की, ब्राह्मणांनी सरकारी नोकरीतल्या वरच्या जागा पटकाविल्या होत्या हे खरे नव्हते. अव्वल कारकून, फार तर मामलेदार अशा जागी ब्राह्मण असत व त्यांचा अधिकार व दरारा ब्राह्मणेतरांच्या डोळ्यावर येई.

ब्राह्मणांचा - विशेषतः चित्पावन ब्राह्मणांचा - राग इंग्रज सरकार करीत असले तरी ब्राह्मण नोकरांविषयी त्यांचे चांगले मत असावे, असे दिसते. जॅक्सन-खुनाच्या विषयी कृष्णाजी अर्जुन केळूसकर यांनी लिहिले होते की, 'या खुनातील एक वेडगळ मारवाडी वगळता बाकी सर्व चित्तपावन आहेत.' (हेही खरे नव्हते. फाशी गेलेले देशपांडे हे चित्पावन नव्हते.) हा लेख 'जगद्वृत्त' या सरकारी मदतीवर चालणाऱ्या पत्रात आला होता. त्या विरूद्ध बराच गवगवा झाला. म्हणून मुंबईच्या गव्हर्नरचे खाजगी सचिव 'रू' यांनी केळूसकरांना ताकीद देण्यासाठी बोलावले. त्या वेळी 'रू' यांनी दोन विधाने केली ती लक्षात घेण्याजोगी होती. पहिले, 'आमच्या राज्यकारभाराला ब्राह्मण जातीची पुष्कळ मदत होत असते. त्यांच्या मदतीवाचून तो कधीही नीट चालला नसता.' दुसरे विधान असे की, 'ब्राह्मण लोक अतिशयित हुशार असतात, त्यामुळे आम्हाला त्यांचा फार उपयोग होतो.'[११]

ब्राह्मणांनी इंग्रजी राज्यातील नोकऱ्याच मिळविल्या असे नाही. ब्राह्मण संस्थानातून तर बहुतेक सर्व जागी ब्राह्मण होतेच; पण कोल्हापूर आणि फलटणसारख्या मराठा संस्थानातील नोकऱ्याही ब्राह्मणांनीच काबीज केल्या होत्या. १८९४ साली शाहू छत्रपती गादीवर आले तेव्हा संस्थानातील ५०० कारकुनांपैकी फक्त १० ब्राह्मणेतर होते. त्यानंतरच्या ११ वर्षात, शाहू छत्रपतींनी केलेले प्रयत्न जमेस धरूनही ब्राह्मणेतर कारकुनांची संख्या ६० च्या पलिकडे गेली नव्हती.[१२] यावरून हे उघड आहे की, शिकलेले व नोकरी करू इच्छिणारे ब्राह्मणेतर, त्या काळात, संख्येने अगदीच कमी होते. १९११ सालच्या जनगणनेतील आकडेवारीवरून तर हे ढळढळीत दिसते. दर १०,००० चित्पावन ब्राह्मणांपैकी ९७२ जण इंग्रजी लिहू-वाचू शकत होते तर मराठ्यात हे प्रमाण १०,००० व्यक्तींमागे फक्त ११ इतके होते.[१३] शिवाय हे सुशिक्षित मराठा तरुण कदाचित् उच्च कुळीचे असतील व त्यामुळे नोकरीसाठी उत्सुकही नसतील.

यावरून हे स्पष्ट होईल की, रोजगाराच्या क्षेत्रात निर्माण झालेली ब्राह्मणांची मक्तेदारी ही काही ब्राह्मणांच्या कारस्थानामुळे निर्माण झाली, अशी स्थिती नव्हती. ऐतिहासिक परिस्थितीच अशी जुळून आली होती की, नोकऱ्यात ब्राह्मणांचीच भरती व्हावी. पण याला दुसरीही बाजू होती. आधुनिक विचार महाराष्ट्रात आले खरे; पण ते काही कोऱ्या पाटीवर लिहिले गेले असे नव्हे. येथील समाजाला जातवारीने जगण्याची, विचार करण्याची व प्रतिकूल परिस्थितीला तोंड देण्याची सवय लागली होती. जात ही सामाजिक सुरक्षिततेची व्यवस्था होती. जातीला सोडून फटकून राहण्यासारखी स्थिती नव्हती. एक माणूस शिकून नोकरीला लागला की, त्याच्या नातलगातील व ओळखीतील होतकरू मुलांची त्या माणसाजवळ येऊन राहून शिकण्यासाठी रांग लागायची. न्या. रानडे, लो. टिळक अशा प्रतिष्ठितांकडे एका वेळी दसकड्यांनी विद्यार्थी आश्रयाला राहून शिकत असत. अशा स्थितीत नोकऱ्यांसाठी चालणारी स्पर्धा व्यक्ती-व्यक्तीत न राहता ती सहजच जाती-जातीतील स्पर्धा झाली. (एका जातीतील दोन व्यक्तीत स्पर्धा असेच.) त्यातून इंग्रजी विद्या शिकलेल्या ब्राह्मणात एक अहंकार निर्माण झाला होता.[१४] तो असा की, जबाबदारीने नोकरी करण्यास आपणच काय ते लायक आहोत. या अहंकाराची उदाहरणे प्रा. य. दि. फडके यांनी दिली आहेत.[१५]

त्यातून, पूर्वी म्हटल्याप्रमाणे, येथील अर्थव्यवस्था झपाट्याने विस्तार पावत असती व नोकरीच्या आणि उद्योगाच्या भरपूर संधी निर्माण होत असत्या तर नोकरीसाठी जाती-जातीत चाललेल्या या स्पर्धेला असूयेचे रूप आले नसते. पण अर्थव्यवस्था बहुतेक स्तब्धावस्थेत होती. त्यामुळे शाहू छत्रपती किंवा सयाजीराव महाराज यांना राखीव जागा ठेवून ब्राह्मणेतरांची


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

नोकरीत भरती करण्याची इच्छा झाली; इतकेच नव्हे तर सुशिक्षित ब्राह्मणेतर तयार व्हावेत यासाठी त्यांच्या शिक्षणाची व्यवस्था करावी लागली. इथे हे लक्षात घेणे जरूर आहे की, शाहू छत्रपतींनी विद्यार्थ्यांसाठी जातवार वसतिगृहे निर्माण केली. कारण येथील समाजाकडे, त्या वेळच्या परिस्थितीनुसार, निरनिराळ्या जातींचा संघ म्हणून पाहणेच त्यांना व्यावहारिक वाटले असावे. प्रत्येक जातीने आपल्यातील मनुष्यालाच आपला नेता म्हणून स्वीकारावे असा त्यांचा आग्रह, याच कारणाने, असो.

१९०२ सालच्या जुलै महिन्यात शाहू छत्रपती यांनी असा हुकूम काढला की, संस्थानातील नोकरीच्या जागांपैकी ५०% जागा मागास जातींसाठी राखून ठेवाव्यात. ब्राह्मण, पारशी आणि प्रभू या जाती वगळता बाकीच्या जाती मागास होत.[६] लठ्ठे यांनी म्हटले आहे की, लोकसंख्येतील प्रमाण पाहता मागास जातींसाठी राखीव ठेवलेल्या जागांची संख्या कमी होती. महाराष्ट्रातील वास्तव पाहता शाहू छत्रपतींचे हे धोरण पुरोगामी गणले गेले आहे. पण इंग्रजांनी जी भांडवलदारी प्रगती कल्पिली होती व जीनुसार व्यक्तीकडे धर्म-जात-लिंग-निरपेक्ष दृष्टीने पाहून तिची निवड करणे अपेक्षित होते, त्या प्रगतीला प्रतिकूल असा हा हुकूम होता. प्रगतीची भांडवलदारी दिशा व महाराष्ट्रातील परिस्थिती यांच्यातील ती तडजोड होती.

**(३)**

नोकरीत बहुसंख्येने होणारी ब्राह्मणांची भरती ही सुशिक्षित ब्राह्मणेतरांना असूया वाटायला लावणारी बाब होतीच; पण भास्करराव जाधव, अण्णासाहेब लठ्ठे, (पुढे प्रबोधनकार झालेले) केशवराव ठाकरे, वा. दा. कोठारी यांच्या सारख्या बुद्धिमान, अभिमानी आणि महत्त्वाकांक्षी ब्राह्मणेतर विचारवंतांना ब्राह्मणांचा सांस्कृतिक व सार्वजनिक जीवनावर असलेला पगडा (हेगेमनी) फार सलत असे. ग्रामशी (१८९१-१९३७) या मार्क्सवादी विचारवंताने असे युद्धतंत्र सुचविले होते की, प्रस्थापितांच्या वर्चस्वाला सुरूंग लावायचा असेल तर रयतेने पर्यायी विचारसरणी उभी केली पाहिजे. याला ग्रामशी भूमिकायुद्ध (वॉर ऑफ पोझिशन) म्हणतो.[७] ब्राह्मणांच्या विचार-व्यूहातील प्रत्येक घटकाला प्रतियोगी उभा केला पाहिजे, अशी मोहीम या विचारवंतांनी चालू केली. म्हणून भास्करराव जाधव यांनी रामायणावर पुस्तक लिहिले. कोठारींनी 'गीतारहस्यांवर टीका' केली व ठाकऱ्यांनी कायस्थांविषयी इतिहासाचार्य राजवाड्यांनी मांडलेल्या उपपत्तीचा प्रतिवाद कोदंडाच्या टणत्काराने केला. खरे तर या प्रकारच्या डावपेचांची सुरुवात महात्मा फुल्यांनी पौराणिक कथांचा 'कूटार्थ' उलगडून पूर्वीच केली होती.

तथापि, लठ्ठ्यांनी म्हटल्याप्रमाणे, "ब्राह्मण आपल्याच जगात मशगूल होऊन राहिले होते. त्यांची काही प्राप्तव्ये होती, त्या प्राप्तव्यांच्या मागे ते लागले होते. बाकीच्या जातींची काय स्थिती आहे याची त्यांना काहीच पर्वा नव्हती. इतर जातींची अस्मिता चुरगाळून टाकून आपली महत्ता व जन्मजात श्रेष्ठत्व प्रस्थापित करण्याची इच्छा बाळगून ते वागत होते."[८] हे निरीक्षण एकांगी वाटले तरी त्यात तथ्य आहेच. त्याचा प्रत्यय आपल्याला इतिहासाचार्य राजवाड्यांचा 'महाराष्ट्रातील कर्त्या पुरुषांची मोजदाद' या १९१३ सालच्या लेखातून येतो.[९] या लेखात त्यांनी प्रथम १५० व्यक्ती निवडल्या. त्यात १६ ब्राह्मणेतर होत्या. त्यापैकी 'बुद्धिमान व प्रतिभावान' मनुष्यांची यादी केली. तीत ४३ नावे असून त्यापैकी फक्त ३ ब्राह्मणेतर आहेत. (येथे मी सारस्वतांची गणना ब्राह्मणातच केली आहे.) अखेर फक्त २३ हयात आणि प्रख्यात कर्तृत्ववान माणसांची यादी केली. तिच्यात सयाजी महाराज व विठ्ठल रामजी शिंदे एवढ्या दोनच ब्राह्मणेतर व्यक्ती होत्या. या संपूर्ण लेखात शाहू छत्रपती व महात्मा फुले यांची नावे कोठेही आलेली नाहीत. आपण वादासाठी असेही धरून चालू की, ब्राह्मणेतरात इतकीच प्रख्यात व कर्तृत्ववान माणसे निःपक्षपाती दृष्टीने शोध घेतला तरी आढळली असती. पण ही परिस्थिती खंत वाटण्याजोगी आहे, अशा अर्थाचे वाक्यही या लेखात नाही. कर्तृत्ववान मनुष्यांची एकूण संख्याच फार कमी आहे याविषयी चिंता मात्र व्यक्त केली आहे.

ब्राह्मणांचे (व इतर जातींचेही) हे लखोटबंद (राजवाड्यांचा शब्द) जीवन ही शोचनीय गोष्ट निश्चितच

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

होती. पण याचा काही दोष तरी, मागे सांगितलेल्या, स्तब्ध अशा आर्थिक व्यवस्थेकडे जातो. अर्थव्यवस्था जर चैतन्यपूर्ण असती, नवीन उद्योग सुरू होत असते, विमा, बँका, समभाग यांच्या निमित्ताने विविध जातीतील माणसे एकमेकांच्या सान्निध्यात आली असती तर जातिजातींमधला हा तुटकपणा कमी व्हायला मदत झाली असती. श्रीधर व्यंकटेश केतकर (पुढे ज्ञानकोशकार म्हणून प्रसिद्धीस आलेले) यांनी १९११ साली जातिभेद मोडण्याचा एक बारा कलमी कार्यक्रम सुचविला होता. त्यातील तीन कलमांचे उद्दिष्ट जातिजातीतील अभिसरण वाढावे, हे होते. निरनिराळ्या जातीतील माणसे एकत्र यावीत यासाठी उत्सव, मेजवान्या, क्लब असे उपक्रम करावेत, अशी एक सूचना होती.[१०]

'प्रभाव' ही अशी गोष्ट आहे की, ती कोणी कोणावर लादू शकत नाही; एका पक्षाने दुसऱ्या पक्षाचा 'प्रभाव' स्वखुशीने मान्य केलेला असतो. लठ्ठे, जाधव, वा. दा. कोठारी इत्यादींना ब्राह्मणांच्या प्रभावाचे कितीही वैषम्य वाटले तरी सर्वसाधारण ब्राह्मणेतर मनुष्य ब्राह्मणांचा प्रभाव स्वीकारूनच चालत होता. प्रा. मोरे यांनी अशा प्रभावाचे एक उदाहरण (धनी) वि. रा. वेलणकर यांच्या पुस्तकातून दिले आहे.[११] लिखापढी, विद्वत्ता, स्वच्छ भाषा ही ब्राह्मणांची क्षेत्रे होत अशी सर्वसाधारण समजूत होती. शिवराम गणपत पवार हे व्यवसायाने प्राथमिक शिक्षक होते, तरी त्यांनी गणित व ग्रहगणित यांचा दांडगा अभ्यास करून 'करण कौमुदी' नावाचा ग्रंथ सन १९०७ मध्ये लिहिला. त्याच्या प्रस्तावनेत ते लिहितात, 'मी मराठ्यांच्या कुळात उत्पन्न झालो आहे आणि मराठ्यात विद्येची विशेष आवश्यकता वाटत नाही... ज्यांनी मला उत्तेजन दिले ते माझे प्रिय गुरूजी कै. भास्कर महादेव केळकर हे होत. ...माझे द्वितीय गुरूजी कै. रावजीशास्त्री देवकुळे यांनी मला त्रिकोणमितीचे सोपपत्तिक शिक्षण दिले. ...ह्या विषयांचे अध्ययन करून नंतर ज्योतिःशास्त्राचा अभ्यास करणे अशी मला आज्ञा केली होती.' 'जागृति'कार भ. ब. पालेकर हे ब्राह्मणांच्या प्रभावाला न जुमानणारे. पण त्यांनी अशी आठवण दिली आहे की, वाळवे तालुक्यातील कुरळप या गावचे विठू नामा पाटील यांनी देवघरात 'गीतारहस्य' हा ग्रंथ ठेवला होता व त्याची ते भक्तिभावाने रोज पूजा करीत. केवळ टिळकांवरील भक्तिप्रेमामुळेच विठू पाटलासारखी अशिक्षित माणसेही त्याकाळी गीता-रहस्य आपल्या संग्रही ठेवीत असत.[१२] याच पालेकरांनी टिळकांवर अप्रतिम मृत्युलेख लिहिला आहे.[१३] त्यात ते म्हणतात, 'टिळक जिवंत होते तोपर्यंत महाराष्ट्राचा हा पुढारीपणा कायमच होता. आता मात्र महाराष्ट्र मागे पडले. आता महाराष्ट्राला इतर प्रांतांच्या तोंडाकडे पाहण्याची वेळ आली. या दृष्टीने आम्हा महाराष्ट्रीयांना टिळकांच्या मृत्यूने विशेष दुःख झाल्यास आश्चर्य नाही.' कृष्णराव अर्जुन केळूसकर यांना ब्राह्मण व्यक्तींचे अनेक खारट-तुरट अनुभव आले व ब्राह्मणेतर व्यक्तींचेही कडू-गोड अनुभव आले. उपनिषदांच्या मराठी भाषांतराचे काम बडोदा-संस्थानाकडून केळूसकरांना मिळण्याच्या कामात ब्राह्मणांनी कसे अडथळे आणले याचे वर्णन प्रा. मोरे यांनी केले आहे.[१४] (२७४-७५) परंतु, हे अडथळे आणणाऱ्यात 'गांगनाईक भानू केशव' या भंडारी गृहस्थांचा मोठा भाग होता, हे केळूसकरांनीच लिहिले आहे.[१५] केळूसकरांनाही ब्राह्मणी प्रभावाचा तिटकारा होताच. 'रामदासांनी शिवाजीमहाराजांना प्रेरणा दिली.' असा ब्राह्मण अभ्यासकांनी दावा मांडला होता, त्याचा प्रतिवाद केळूसकरांनी केला होता. तथापि, कृष्णशास्त्री गोडबोले यांनी आपल्यावर उत्तम नीतिसंस्कार केले तसेच विष्णुशास्त्री चिपळूणकरांच्या 'निबंधमाले'च्या वाचनाने आपली भाषा घटवली गेली, हे ते निःसंकोचपणे मान्य करतात. हे सर्व सांगण्याचे कारण इतकेच की, ब्राह्मणाचा प्रभाव हा बहुतेक ब्राह्मणेतर मंडळींनी मान्यच केला होता; आणि तशी मान्यता दिल्याने ब्राह्मणेतरांच्या अस्मितेला तडा जातो अशी भावना इंग्रजी शिक्षण घेतलेल्या ब्राह्मणेतरांपैकी काहींनाच अस्वस्थ करीत होती.

(४)

मॉंटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणांच्या काळात लठ्ठे, भास्करराव जाधव, कोठारी इत्यादी ब्राह्मणेतर चळवळ्यांनी शाहू छत्रपतींच्या पाठिंब्याने ब्राह्मणेतर पक्ष स्थापन केला. मराठा जातीवर ब्राह्मणांचा प्रभाव आहे या


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

कारणाने मराठ्यांच्या मतावर ब्राह्मणच निवडून येतील व मराठ्यांना प्रतिनिधित्व मिळणार नाही असा प्रचार करून मराठ्यांसाठी राखीव मतदार संघ किंवा राखीव जागा मिळाव्यात असा प्रयत्न ब्राह्मणेतर पक्षाने सुरू केला. याची नोंद प्रा.मोरे यांनी घेतली आहे (३५८), पण त्यांनी आपल्या पुस्तकात कोठेही हे सांगितलेले नाही की, मराठा व तत्सम जातीसाठी काही राखीव जागा ठेवण्यात आल्या होत्या. प्रा. य. दि. फडके यांनी फक्त एका वाक्यात या राखीव जागांची दखल घेतली आहे.[२६] हकीकत अशी होती की, मॉँटेग्यू साहेबाच्या योजनेत जरी मराठा जातीसाठी राखीव जागांची तरतूद नसली तरी मतदारसंघ ठरवणारी लॉर्ड साऊथबरा यांची समिती, या योजनेचा एक भाग म्हणून, स्थापन करण्यात आली होती; या समितीकडे मुंबई सरकारने मराठा जातीसाठी राखीव जागा (स्वतंत्र मतदार संघ नव्हेत)असाव्यात अशी शिफारस केली. ही शिफारस करताना सरकारने म्हटले होते की, 'मराठा जात ही एकूण लोकसंख्येचा महत्त्वाचा आणि अलग असा हिस्सा आहे. हिंदी लष्करात या जातीतून पुष्कळ जवान भरती होतात. खरे तर त्यांची संख्या पाहता आणि या जातीचे महत्त्व लक्षात घेता यांना कायदेमंडळात (आपसूकच) प्रतिनिधित्व मिळाले पाहिजे. पण ह्या जातीवर ब्राह्मणांचा एवढा जबरदस्त प्रभाव आहे की, ज्या मतदार संघात ते बहुसंख्येने आहेत तेथे देखील त्यांना आपल्या जातीचा उमेदवार निवडून आणणे शक्य होणार नाही.'[२७] त्यानंतर मतदार संघ ठरविणाऱ्या समितीने मराठा जातीसाठी महाराष्ट्रातील २५ जागांपैकी ९ जागा राखीव ठेवल्या. विशेष असे की, जिथे या जागा राखीव होत्या त्या मतदारसंघात मराठा मतदारांची संख्या ६५ ते ७० टक्क्यांपर्यंत होती. उदा. अहमदनगरमध्ये १७,२०४ मतदारांपैकी १४ हजार ९१० मतदार मराठा होते. यातील बहुतेक मतदार संघ एका पेक्षा जास्त प्रतिनिधी निवडून देणारे मतदारसंघ होते. खरे तर मराठा मतदारांनी मतांचे नीट वाटप केले असते तर त्यांना ३ प्रतिनिधींच्या मतदार संघात दोन तरी मराठा प्रतिनिधी राखीव जागांचा आधार न घेता निवडून आणता आले असते. उदा. सातारा मतदारसंघात २१,५३३ मतदारांपैकी १५,२३६ मतदार मराठा होते. या मतदारसंघातून तीन प्रतिनिधी निवडून जात यापैकी दोन प्रतिनिधी मराठा असण्याला काहीच अडचण नव्हती. पण १९२०, २३, २६ या तिन्ही निवडणुकात फक्त १ मराठा प्रतिनिधी (तोही राखीव जागेवर) निवडून गेला. २० व २३ सालच्या निवडणुकात ब्राह्मणेतर पक्षाने पार्शी कूपर शेठ यांना पाठिंबा देऊन सर्वसाधारण जागेवर निवडून आणले.[२८]

हा सर्व प्रपंच करण्याचे कारण असे की, प्रा. य. दि. फडके व (त्यांचाच अनुवाद करीत) प्रा. मोरे यांनी टिळक-पक्षावर जी टीका केली आहे, तिची पृष्ठभूमी स्पष्ट व्हावी. प्रा. फडके लिहितात 'लखनौ काँग्रेसमध्ये मुसलमानांच्या मागण्यांबाबत औदार्य दाखविणारे टिळक या जातींच्या (पक्षी: ब्राह्मणेतर) आकांक्षांचा सहानुभूतीचे विचार करण्यास तयार नव्हते. टिळकांनी ब्राह्मणांच्या वर्चस्वाचे समर्थन केल्याने टिळक ब्राह्मणेतर चळवळीच्या माऱ्याचे लक्ष्य बनले'[२९] प्रा. मोरे यांनी म्हटले आहे की, '१९१६ मध्ये मुस्लिम लीगशी करार करून मुस्लिमांना राष्ट्रीय स्वातंत्र्यांच्या चळवळीकडे वळवण्याच्या प्रयत्नात (त्यांच्याच काही सहकाऱ्यांच्या आक्षेपानुसार) अवाजवी दान देणाऱ्या टिळकांच्या लक्षात ब्राह्मणेतर आणि अस्पृश्य या संभाव्य वाटेकऱ्यांचे अस्तित्व आले नाही. लखनौमध्येच त्यांनी ब्राह्मणेतरांना व अस्पृश्यांना आपण होऊन स्थान देऊ केले असते तर पुढील कटुता टळली असती.' (३४१).

मला वाटते की, इथे अनेक संकल्पना, तथ्ये (फॅक्ट्स्) आणि पूर्वग्रह यांचा गुंता झाला आहे. प्रा. मोरे यांनी आपल्या पुस्तकात वारंवार लखनौ करार, त्याला टिळकांच्या पुंज्यांसारख्या अनुयायांचा विरोध आणि टिळकांनी दाखविलेले औदार्य यांचा उल्लेख केला आहे. परंतु जो करार झाला तो टिळकांच्या दृष्टीने एक 'पूर्वघटित' (फेटाकॉम्प्ली) होते. ना. गोखल्यांनी शेवटच्या आजारात केलेले टिपण, त्यावरून मध्यवर्ती कायदे-मंडळाच्या जीना, मालवीय इ. १९ सभासदांनी केलेला मसुदा आणि १८८३ साली स्थानिक स्वराज्याच्या निवडणुका सुरू झाल्या पासून मुसलमानांना मिळालेले व १९०९ सालच्या मोर्ले-मिंटो सुधारणांमुळे पक्के झालेले

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

स्वतंत्र प्रतिनिधित्व[३०] ही पूर्वपीठिका लक्षात घेता टिळकांना हा करार करणे व्यवहार्य वाटले असेल. दुसरे असे की, हा करार म्हणजे काँग्रेस आणि मुस्लिम लीग यांनी एकमताने केलेला सुधारणांचा आराखडा होता व त्या सुधारणा मिळाव्यात याची चळवळ करण्याला दोन्ही पक्ष तयार झाले होते. बरे, तेव्हा काँग्रेसमध्ये टिळकांना हुकमी बहुमत होते, अशीही स्थिती नव्हती. नेमस्तांचा प्रबळ गट काँग्रेसमध्ये होता. जरी जहालांनी कराराला विरोध केला असता तरी हा करार काँग्रेसमध्ये मंजूर झाला असता. या उलट प्राध्यापक फडके किंवा मोरे म्हणतात त्याप्रमाणे ब्राह्मणेतरांशी स्वतंत्र मतदार संघांचा किंवा राखीव जागांचा (या दोन गोष्टी निराळ्या आहेत) करार कोणत्या तत्त्वावर करायचा? ब्राह्मणेतरांची बहुसंख्या होती. एकेका मतदार संघात ब्राह्मणेतर ६५ ते ७० टक्क्यांपर्यंत होते, हे वर दाखवलेच आहे. त्यांची इच्छा असती तर सर्वच्या सर्व ब्राह्मणेतर निवडून आणता आले असते. अशा स्थितीत ब्राह्मणेतरांनी राखीव जागा मागाव्यात हेच विपरीत दिसते. बरे, ब्राह्मणेतर पुढाऱ्यांच्या प्रचाराला न जुमानता जर बहुसंख्य असणारे ब्राह्मणेतर ब्राह्मण उमेदवारांना निवडून देत असतील, तर ते लोकशाहीला धरूनच होते. ज्या पुढाऱ्यांचा मतदारसंघांवर काबू नाही त्यांच्याशी करार कशासाठी करायचा? याहून महत्त्वाचा मुद्दा असा की, या ब्राह्मणेतर पुढाऱ्यांना टिळकांच्या काँग्रेस डेमोक्रॅटिक पार्टीचे सभासद होऊन व तेथे आपला दबावगट निर्माण करून त्याच पक्षातर्फे निवडणुका लढविण्याला कोणी अटकाव केला होता? टिळक पक्षात किती ब्राह्मणेतर व्यक्ती होत्या याचा उल्लेख प्रा. फडक्यांनी केलाच आहे.[३१] 'स्वराज्य संघ' उर्फ 'होमरुल लीग' या टिळकांच्या पक्षात ४२ टक्के ब्राह्मण व ४३ टक्के ब्राह्मणेतर सभासद होते असा उल्लेख आहे.[३२] अशा स्थितीत ब्राह्मणेतर पक्षाशी करार करून, त्यांना राखीव जागा न दिल्या तरी, पक्षाची उमेदवारी देणे याचा अर्थ स्वपक्षातील ब्राह्मणेतरांची उपेक्षा करणे असा झाला असता. गोष्ट अशी आहे की, शाहू छत्रपतींच्या उघड व इंग्रज सरकारच्या छुप्या पाठिंब्यावर चळवळ करणारा ब्राह्मणेतर पक्ष काँग्रेस पक्षाचे उपांग असणाऱ्या काँग्रेस डेमोक्रॅटिक पक्षाशी कोणत्याच प्रकारचा समझोता करू शकत नव्हता.

शेवटी असे की, मोर्ले-मिंटो सुधारणा काय किंवा माँटेग्यू चेम्सफर्ड सुधारणा काय यांचा खरा उपयोग जाति-धर्मातील नागरिकत्व ही संकल्पना प्रचलित करण्यासाठी व्हायला हवा होता. भांडवलशाही सुधारणा हिचे अंतिम राजकीय उद्दिष्ट नागरिकत्वाची भावना निर्माण करणे हे होते. माँटेग्यू-चेम्सफर्ड सुधारणांच्या अहवालात अहवालकर्त्यांनी ठिकठिकाणी अशी खंत व्यक्त केली आहे की, राखीव मतदार संघ व राखीव जागा यांच्या तरतुदी 'नागरिकत्व' ही भावना लोकात निर्माण करण्याला आडकाठी ठरणाऱ्या आहेत. परंतु, हिंदुस्थानातील व महाराष्ट्रातील वास्तव विचारात घेता - म्हणजे व्यक्तीला आपली जात व धर्म यांचा आधार घेऊन जगण्याची सवय लागली होती, ती पाहता - राखीव मतदारसंघ आणि राखीव जागा यांना माँटेग्यूला स्थान द्यावे लागले. नोकरीतील राखीव जागा ही जशी भांडवलशाही सुधारणा व भारतीय वास्तव यांच्यातील तडजोड होती त्याच प्रमाणे निवडणुकांसाठी राखीव मतदार संघ व राखीव जागा ही देखील भांडवलदारी सुधारणांची उद्दिष्टे व भारतातील सामाजिक वास्तव यांच्यातील अपरिहार्य परंतु खेददायक तडजोड होती.

(याच लेखात मी 'वेदोक्त' वादाचाही विचार करणार होतो. पण लेख फार लांबल्यामुळे त्याबद्दलचे लिखाण पुढील लेखावर टाकावे लागत आहे.)



**तळटीपा**

१. कार्ल मार्क्स व फ्रेडरिक एंगल्स : कलेक्टेड वर्क्स, व्हॉ. ६, पान ४८८

२. जे. डी. ब्यूरी : दी आयडिया ऑफ प्रोग्रेस (१९६०) पा. ३०३–३०५

३. एडवर्ड थॉम्प्सन व जी. टी. गॅरेट : राईज ॲण्ड फुलफिलमेंट ऑफ ब्रिटिश रूल इन इंडिया (१९७३) पान ३१८. अवतरण चिन्हातील मजकूर मूळ इंग्रजी मजकुरावर आधारलेला परंतु स्वतंत्र









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आहे.

४. जगन्नाथ चक्रवर्ती (संपा.) स्टडीज इन बेंगॉल रेनेसान्स (१९७३) पान १४

५. निबंधमाला (चित्रशालाप्रत) पा. ९७०–७४

६. 'ब्राह्मण आणि त्यांची विद्या' पान १३८

७. उपरोक्त. पान १४६–४७

८. संकीर्ण लेख. पान १४१

९. 'ब्राह्मण आणि त्यांची विद्या' प्रस्तावना

१०. सेन्सस ऑफ इंडिया १९११ व्हॉ. ७, पार्ट १, पान ३३८

११. गुरूवर्य कृष्णराव अर्जुन केळूसकर आत्मचरित्र व चरित्र (१९७७) पा. ११७–१८

१२. मेम्वाज ऑफ हिज हायनेस श्री शाहू छत्रपती महाराजा ऑफ कोल्हापूर (१९२४) व्हॉ. १ पान १५५

१३. उपरोक्त पान १३०

१४. लो. टिळकांचे केसरीतील लेख भाग ४ था (१९३०) पा. २३२–३३

१५. शाहू छत्रपती व लोकमान्य टिळक (१९८६) पा. ७५

१६. मेम्वाज. उपरोक्त. पा. १५४

१७. ए डिक्शनरी ऑफ मार्क्सिस्ट थॉट (१९८३) पा. १९५. ग्रामशी युरोपातील प्रगत भांडवलदारी राष्ट्रांविषयी लिहीत होता. महाराष्ट्राला ग्रामशीचे विचार जसेच्या तसे लागू होत नाहीत. उदा. ब्राह्मण सत्ताधारी नव्हते व त्यांनी मांडलेला विचारव्यूह सत्ताधाऱ्यांना पाठिंबा देणारा नव्हता. पण महाराष्ट्राचे वैचारिक व सांस्कृतिक क्षेत्र घेतले तर तेथे ब्राह्मणांचे वर्चस्व होते व त्याच्या विरोधात ब्राह्मणेतर विचारवंत उभे होते.

१८. मेम्वाज. (उपरोक्त) पा. १५७

१९. वि. का. राजवाडे राजवाडे लेख संग्रह भाग ३ (१९३५) पाने १६९–८४

२०. संकीर्ण लेख. उपरोक्त. पान ४२–४३

२१. लोकमान्य ते महात्मा. पा. ७५७

२२. 'जागृति'कार पालेकर (१९६१) पा. ३०

२३. उपरोक्त पान १४४

२४. कंसातील आकडे 'लोकमान्य ते महात्मा' या पुस्तकातील.

२५. केळूसकर. उपरोक्त. पान ९९

२६. शाहूछत्रपती व लोकमान्य टिळक पान २५५. विसाव्या शतकातील महाराष्ट्र, खंड २, पाने २५८–६२. इथे प्रा.य. दि. फडके यांनी मराठा व तत्सम जाती यांना राखीव जागा ठेवण्याबाबतच्या घालमेलीची बरीच हकीकत दिली आहे. पण 'अशा राखीव जागा होत्या' असे स्पष्ट म्हटलेले नाही.

२७. मेमोरँडम प्रिपेअर्ड बाय द गव्हर्नमेंट ऑफ बॉम्बे फॉर सबमिशन टु दी इंडियन स्टॅट्युटरी कमिशन (१९२८). पार्ट. डी. प्रपोझल्स. पा.११

२८. उपरोक्त. ॲपेंडिक्स बी. पान ४८४

२९. विसाव्या शतकातील महाराष्ट्र खंड २. पान २७७

३०. उपरोक्त पान ८३. श्री. दुर्गादास यांचा 'फ्रॉम कर्झन टु नेहरू' या ग्रंथातही हीच माहिती आहे.

३१. उपरोक्त पान. २५७

३२. 'गुरूशिष्य यांच्या आठवणी व चरित्र' संपा. किशोर बापट. (१९६५) पा. ४७१.

✠✠✠







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# नारायण वामन टिळक

## सुधीर रसाळ

नारायण वामन टिळकांनी आयुष्याच्या उत्तरार्धात संन्यासाश्रम स्वीकारला. ख्रिस्ती धर्माची आणि हिंदूंची आचारपद्धती यांचे संयुग त्यांच्या संन्यासकल्पनेत पहावयास मिळते. वस्तुतः संन्याससंकल्पना या ना त्या रूपात सर्वच धर्मात आहे. या संबंधी म. म. पां. वा. काणे यांनी म्हटले आहे की, 'भारतीयांना संन्यासधर्माबद्दल सर्वात अधिक आदर वाटतो असे म्हणण्याचा प्रघात आहे. तथापि ते विधान अर्धसत्य स्वरूपाचे आहे. ऐहिक विषयोपभोगाचा त्याग करणे आणि संपत्तीला तुच्छ मानणे ह्यांसारख्या संन्यासाश्रमाच्या लक्षणांपैकी कोणत्यातरी लक्षणांनी युक्त असा संन्यासाश्रम सर्व धर्मांत सामान्यत्वेकरून अस्तित्वात असतो. अशाच प्रकारची ख्रिस्ताची शिकवण असून ती अनेक शतकेपर्यंत मानण्यातही येत असे. अलिकडे तीन चार शतकांत पाश्चिमात्त्य लोक यशस्वी कार्यकर्ते आणि वीर पुरुष ह्यांना आदर्श पुरुष मानू लागले आहेत.'[३६] डॉ. काण्यांचे ख्रिस्ती धर्माविषयीचे म्हणणे जरी खरे असले तरी टिळकांच्या संन्यासामध्ये केवळ 'ऐहिक विषयोपभोगाचा त्याग आणि संपत्तीला तुच्छ मानणे' एवढेच नव्हते. त्याशिवाय त्यांत भारतीय परंपरेतील अनेक गोष्टी होत्या.

टिळकांच्या संन्यासकल्पनेचे स्वरूप पाहण्यापूर्वी भारतीय परंपरेतील संन्यासाचे स्वरूप लक्षात घेतले पाहिजे. भारतीय परंपरेमध्ये संन्यास हा चतुर्थाश्रम आहे. ब्रह्मचर्याश्रम, गृहस्थाश्रम आणि वानप्रस्थाश्रम या तीन आश्रमांचे पालन केल्यानंतर, आयुष्याच्या शेवटच्या चरणात संन्यासाश्रम सामान्यपणे घेतला जातो. परंतु साधकाची इच्छा असेल तर त्याला गृहस्थाश्रमात असतानाही तो घेता येतो. संन्यास स्वीकारण्यासाठी एक धार्मिक विधी करावा लागतो. मृत्यूशय्येवर असताना घेतल्या जाणाऱ्या 'आतुर संन्यास' नामक संन्यासात मात्र सविस्तर विधी करण्याची गरज नसते. ब्रह्मज्ञानप्राप्ती हा संन्यासस्वीकृतीचा हेतू असतो. ब्रह्मज्ञानप्राप्तीमुळे मोक्ष मिळतो. मोक्षप्राप्ती हा संन्यासाचा अंतिम हेतू असतो. त्यासाठी सर्व मानसिक - शारीरिक शक्ती केवळ ब्रह्मज्ञानाच्या प्राप्तीकडे वळवाव्या लागतात. तशा त्या वळाव्यात म्हणून सर्व ऐहिक गोष्टींचा म्हणजेच स्त्रीसहवासाचा आणि स्वतःजवळच्या धनादी सर्व वस्तूंचा त्याला त्याग करावा लागतो. तसेच या ऐहिक गोष्टी आध्यात्मिक साधनेमध्ये अडथळा आणणाऱ्या आहेत, असेही मानले जाते. त्यासाठी मुख्यत्वे करून ऐहिक उपभोगाच्या सर्व इच्छा माराव्या लागतात. त्यामुळेच संन्यास म्हणजे 'काम्य कर्मांचा त्याग' असे म्हटले जाते. दंड, पाण्याचा कलश, भिक्षापात्र, अंगावरील भगवे वस्त्र या खेरीज त्याला आपल्याजवळ काहीही ठेवता येत नाही. संन्यासाचे अनेक प्रकार आहेत. ज्याला आध्यात्मिक साधनेतून आधीच ब्रह्मज्ञानप्राप्ती झाली आहे त्याने घेतलेल्या संन्यासाला 'विद्वत संन्यास' म्हणतात. ह्या संन्याशाला जिवंतपणीच जीवन्मुक्ती लाभलेली असते. ब्रह्मज्ञानाच्या प्राप्तीसाठी घेतलेल्या संन्यासास 'विविदिषू संन्यास' असे नाव आहे. येथे संन्यास घेऊन ब्रह्मज्ञानप्राप्तीसाठी साधना केली जाते. विविदिषू संन्याशास जिवंतपणी नव्हे तर देहविसर्जनानंतर मुक्ती लाभते. संन्याशाने केलेल्या कर्मांची त्याला बाधा होत नाही. कारण त्याने केलेले कर्म हे फलनिरपेक्ष असते; त्यामागे कुठल्याही वासनेच्या तृप्तीचे उद्दिष्ट असत नाही. त्याला गावाच्या बाहेर, नदीकाठ, ओसाड वास्तू, स्मशान, अरण्य, गुहा यांसारख्या ठिकाणी वास्तव्य करावे लागते. गावात तो फक्त भिक्षेसाठीच येतो. त्याला एकभुक्त रहावे लागते. अन्नग्रहण केवळ प्राण व शरीर टिकवण्यासाठीच करावयाचे असते. त्याला कुठल्याही ठिकाणी तीन दिवसांच्या वर राहता येत नाही. फक्त पावसाळ्यातच तो एके ठिकाणी वास्तव्य करू शकतो. त्याने एकाकीपणे सतत भ्रमंती करीत राहीले पाहिजे. भ्रमंतीत त्याला सोबत घेता येत नाही. त्याला षडरिपूंवर तर विजय मिळवावा









राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

लागतोच त्याशिवाय अहिंसा, सत्य, अस्तेय, अक्रोध, गुरुशुश्रूषा इत्यादी प्रतिज्ञांचे पालनही करावे लागते. मनूने संन्याशाचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे. 'तो मैत्री भावनेचे संवर्धन करतो. तो अक्रोधी असल्यामुळे कोणी रागावला तरी त्याची शांती ढळत नाही. कोणी शिवीगाळ केल्यास किंवा भांडायला उठल्यास तो गप्प राहतो. तो कोणाचा अनादर करीत नाही आणि कोणाशी वैरभावही धरीत नाही. तो अहिंसाधर्माचे पालन करीत असल्यामुळे त्याच्यापासून कोणत्याही प्राण्याला भय असत नाही. तो सांसारिक विषयांत रस घेत नाही; त्याला फक्त ब्रह्मज्ञानामध्ये रस असतो.'[३७] संन्याशाच्या वर्तनाचे मनूने केलेले हे वर्णन ख्रिस्ती नीतिविचाराशी मिळतेजुळते आहे, हेही येथे लक्षात घेतले पाहिजे.

भारतीय संन्यासकल्पनेसंबंधी थोडक्यात आपणांस पुढील गोष्टी नोंदविता येतील. संन्यासासंबंधी भारतीय कल्पना ही वैयक्तिक मोक्षाच्या उद्दिष्टावर आधारित आहे. हा मोक्ष व्यक्तीला ब्रह्मज्ञानामुळेच मिळतो. म्हणून त्याने संन्यास घेऊन ब्रह्मज्ञानाच्या प्राप्तिसाठी साधना केली पाहिजे. लौकिक जीवनाशी संबंध तोडणे, स्वतःत पूर्ण बाणवणे, सत्य, अहिंसा, अस्तेय इत्यादिकांचे पालन करणे. शरीर आणि प्राण ब्रह्मज्ञानप्राप्तीसाठी आवश्यक असल्यामुळे ते टिकतील एवढेच अन्न ग्रहण करणे. शरीर हे ब्रह्मज्ञानप्राप्तीचे साधन असल्यामुळे ते शुद्ध ठेवणे, काम्य कर्मे निषिद्ध मानणे, या गोष्टींना भारतीय संन्यासकल्पनेत महत्त्वाचे स्थान आहे.

टिळकांच्या मनात संन्यास धारण करण्याचा विचार का आला हे आता आपणास पाहिले पाहिजे. भारताच्या उन्नतीसाठी ख्रिस्तस्वीकृती आवश्यक, तसेच भारतीयांमध्ये ख्रिस्त रुजविण्याच्या पाश्चात्त्य मिशनऱ्यांच्या पद्धतीबद्दल असमाधान, युरोपीय रूपातील ख्रिस्ताच्या स्वीकाराऐवजी पौर्वात्य ख्रिस्ताचा शोध व स्वीकृती, त्याबरोबरच स्वदेशी चर्चची उभारणी आवश्यक, अशी टिळकांची भूमिका असल्याचे आपण यापूर्वीच पाहिले. आम्हा भारतीयांना विचारांवर नव्हे तर व्यक्तींवर श्रद्धा ठेवण्याची सवय आहे; श्रद्धेय व्यक्ती सांगते म्हणून त्याने सांगितलेला विचार आचरणात आणायचा, ही आम्हा भारतीयांची पद्धत आहे; म्हणून प्रथम येशूचे अलौकिक जीवन भारतीयापर्यंत पोचविले पाहिजे आणि नंतर त्याच्या आधारे येशूचा विचार सांगितला पाहिजे; थोडक्यात, भारतात ख्रिस्तविचार जर रुजवायचा असेल तर बायबलमध्ये काय सांगितले आहे यावर भर देण्यापेक्षा येशू ख्रिस्ताने काय सांगितले आहे यावर भर दिला पाहिजे, असे टिळकांना वाटत होते. भारताला ख्रिस्ती धर्माच्या आधी ख्रिस्ताची गरज आहे; आणि येशू भारतीय माणसापर्यंत पोचविण्यासाठी आपण 'प्रेषित' (अपॉस्टल या अर्थी) म्हणून निवडले गेलो आहोत; आता हे आपले आयुष्यभराचे कार्य आहे; असा साक्षात्कार टिळकांना होऊ लागला. आपणच स्थापन केलेल्या 'देवाचा दरबार' या संस्थेद्वारे आपण मानवावर प्रेम करीत, त्याची सेवा करीत ख्रिस्त सामान्य भारतीयापर्यंत पोचवला पाहिजे, त्यासाठी आपण आपल्या वैयक्तिक ऐहिक जीवनाचा त्याग करून केवळ मानवासाठी जगले पाहिजे, असे टिळकांना वाटू लागले. जे. सी. विन्स्लो यांनी म्हटले आहे की, टिळकांना असे वाटू लागले की, भारताला ख्रिस्तत्वाची नव्हे तर ख्रिस्ताची गरज आहे. भारताला भारतीय 'अपॉस्टल' ची गरज आहे. देव आपल्याला 'भारतीय प्रेषित' होण्यासाठी बोलवत आहे, असे त्यांना अधिकाधिक प्रमाणात वाटू लागले. "मी महाराष्ट्राचा 'तुकाराम' म्हणून निवडला गेलो आहे." असे ते म्हणू लागले. तुकाराम आणि सेंट पॉल यांचे संयुग म्हणून जणू ते निवडले गेले होते. आपल्याला हजारो अनुयायी मिळतील आणि भारतीयत्वाच्या धर्तीवर आपण भारतीय चर्च उभे करू शकू, असा विश्वास त्यांना वाटू लागला. येशू आपणांस, त्यांनी पुरस्कारिलेल्या दारिद्र्याच्या आणि साध्या जीवनपद्धतीच्या वाटेने आणि भारतीय संतांना ज्या संन्यासमार्गाचे आकर्षण होते त्या मार्गाने चालण्यासाठी बोलवीत आहे; असा ख्रिस्ताचा साक्षात्कार त्यांना ऑगस्ट १९४७ मध्ये झाला.[३८] लक्ष्मीबाईंनी जरी अशा साक्षात्काराचा उल्लेख केला नसला तरी त्यांनी, या सुमारास 'टिळकांच्या अंतःकरणात मोठी खळबळ उडून राहिल्याचा' निर्देश केला आहे.[३९] ख्रिस्ताकडून आपण विशिष्ट कार्यासाठी निवडले गेलो आहोत असा साक्षात्कार झाल्यानंतर त्यांनी संन्यास घेण्याचा निर्णय घेतला. ६ सप्टेंबर १९१७ च्या ज्ञानोदयात









राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# नारायण वामन टिळक

## सुधीर रंसाळ

नारायण वामन टिळकांनी आयुष्याच्या उत्तरार्धात संन्यासाश्रम स्वीकारला. ख्रिस्ती धर्माची आणि हिंदूंची आचारपद्धती यांचे संयुग त्यांच्या संन्यासकल्पनेत पहावयास मिळते. वस्तुतः संन्याससंकल्पना या ना त्या रूपात सर्वच धर्मात आहे. या संबंधी म. म. पां. वा. काणे यांनी म्हटले आहे की, 'भारतीयांना संन्यासधर्माबद्दल सर्वात अधिक आदर वाटतो असे म्हणण्याचा प्रघात आहे. तथापि ते विधान अर्धसत्य स्वरूपाचे आहे. ऐहिक विषयोपभोगाचा त्याग करणे आणि संपत्तीला तुच्छ मानणे ह्यांसारख्या संन्यासाश्रमाच्या लक्षणांपैकी कोणत्यातरी लक्षणांनी युक्त असा संन्यासाश्रम सर्व धर्मांत सामान्यत्वेकरून अस्तित्वात असतो. अशाच प्रकारची ख्रिस्ताची शिकवण असून ती अनेक शतकेपर्यंत मानण्यातही येत असे. अलिकडे तीन चार शतकांत पाश्चिमात्त्य लोक यशस्वी कार्यकर्ते आणि वीर पुरुष ह्यांना आदर्श पुरुष मानू लागले आहेत.'[३६] डॉ. काण्यांचे ख्रिस्ती धर्माविषयीचे म्हणणे जरी खरे असले तरी टिळकांच्या संन्यासामध्ये केवळ 'ऐहिक विषयोपभोगाचा त्याग आणि संपत्तीला तुच्छ मानणे' एवढेच नव्हते. त्याशिवाय त्यांत भारतीय परंपरेतील अनेक गोष्टी होत्या.

टिळकांच्या संन्यासकल्पनेचे स्वरूप पाहण्यापूर्वी भारतीय परंपरेतील संन्यासाचे स्वरूप लक्षात घेतले पाहिजे. भारतीय परंपरेमध्ये संन्यास हा चतुर्थाश्रम आहे. ब्रह्मचर्याश्रम, गृहस्थाश्रम आणि वानप्रस्थाश्रम या तीन आश्रमांचे पालन केल्यानंतर, आयुष्याच्या शेवटच्या चरणात संन्यासाश्रम सामान्यपणे घेतला जातो. परंतु साधकाची इच्छा असेल तर त्याला गृहस्थाश्रमात असतानाही तो घेता येतो. संन्यास स्वीकारण्यासाठी एक धार्मिक विधी करावा लागतो. मृत्यूशय्येवर असताना घेतल्या जाणाऱ्या 'आतुर संन्यास' नामक संन्यासात मात्र सविस्तर विधी करण्याची गरज नसते. ब्रह्मज्ञानप्राप्ती हा संन्यासस्वीकृतीचा हेतू असतो. ब्रह्मज्ञानप्राप्तीमुळे मोक्ष मिळतो. मोक्षप्राप्ती हा संन्यासाचा अंतिम हेतू असतो. त्यासाठी सर्व मानसिक - शारीरिक शक्ती केवळ ब्रह्मज्ञानाच्या प्राप्तीकडे वळवाव्या लागतात. तशा त्या वळाव्यात म्हणून सर्व ऐहिक गोष्टींचा म्हणजेच स्त्रीसहवासाचा आणि स्वतःजवळच्या धनादी सर्व वस्तूंचा त्याला त्याग करावा लागतो. तसेच या ऐहिक गोष्टी आध्यात्मिक साधनेमध्ये अडथळा आणणाऱ्या आहेत, असेही मानले जाते. त्यासाठी मुख्यत्वे करून ऐहिक उपभोगाच्या सर्व इच्छा माराव्या लागतात. त्यामुळेच संन्यास म्हणजे 'काम्य कर्मांचा त्याग' असे म्हटले जाते. दंड, पाण्याचा कलश, भिक्षापात्र, अंगावरील भगवे वस्त्र या खेरीज त्याला आपल्याजवळ काहीही ठेवता येत नाही. संन्यासाचे अनेक प्रकार आहेत. ज्याला आध्यात्मिक साधनेतून आधीच ब्रह्मज्ञानप्राप्ती झाली आहे त्याने घेतलेल्या संन्यासाला 'विद्वत संन्यास' म्हणतात. ह्या संन्याशाला जिवंतपणीच जीवन्मुक्ती लाभलेली असते. ब्रह्मज्ञानाच्या प्राप्तीसाठी घेतलेल्या संन्यासास 'विविदिषू संन्यास' असे नाव आहे. येथे संन्यास घेऊन ब्रह्मज्ञानप्राप्तीसाठी साधना केली जाते. विविदिषू संन्याशास जिवंतपणी नव्हे तर देहविसर्जनानंतर मुक्ती लाभते. संन्याशाने केलेल्या कर्मांची त्याला बाधा होत नाही. कारण त्याने केलेले कर्म हे फलनिरपेक्ष असते; त्यामागे कुठल्याही वासनेच्या तृप्तीचे उद्दिष्ट असत नाही. त्याला गावाच्या बाहेर, नदीकाठ, ओसाड वास्तू, स्मशान, अरण्य, गुहा यांसारख्या ठिकाणी वास्तव्य करावे लागते. गावात तो फक्त भिक्षेसाठीच येतो. त्याला एकभुक्त रहावे लागते. अन्नग्रहण केवळ प्राण व शरीर टिकवण्यासाठीच करावयाचे असते. त्याला कुठल्याही ठिकाणी तीन दिवसांच्या वर राहता येत नाही. फक्त पावसाळ्यातच तो एके ठिकाणी वास्तव्य करू शकतो. त्याने एकाकीपणे सतत भ्रमंती करीत राहीले पाहिजे. भ्रमंतीत त्याला सोबत घेता येत नाही. त्याला षडरिपूंवर तर विजय मिळवावा







अनुक्रमणिका

राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

लागतोच त्याशिवाय अहिंसा, सत्य, अस्तेय, अक्रोध, गुरुशुश्रूषा इत्यादी प्रतिज्ञांचे पालनही करावे लागते. मनूने संन्याशाचे वर्णन पुढीलप्रमाणे केले आहे. 'तो मैत्री भावनेचे संवर्धन करतो. तो अक्रोधी असल्यामुळे कोणी रागावला तरी त्याची शांती ढळत नाही. कोणी शिवीगाळ केल्यास किंवा भांडायला उठल्यास तो गप्प राहतो. तो कोणाचा अनादर करीत नाही आणि कोणाशी वैरभावही धरीत नाही. तो अहिंसाधर्माचे पालन करीत असल्यामुळे त्याच्यापासून कोणत्याही प्राण्याला भय असत नाही. तो सांसारिक विषयांत रस घेत नाही; त्याला फक्त ब्रह्मज्ञानामध्ये रस असतो.'[१७] संन्याशाच्या वर्तनाचे मनूने केलेले हे वर्णन ख्रिस्ती नीतिविचाराशी मिळतेजुळते आहे, हेही येथे लक्षात घेतले पाहिजे.

भारतीय संन्यासकल्पनेसंबंधी थोडक्यात आपणांस पुढील गोष्टी नोंदविता येतील. संन्यासासंबंधी भारतीय कल्पना ही वैयक्तिक मोक्षाच्या उद्दिष्टावर आधारित आहे. हा मोक्ष व्यक्तीला ब्रह्मज्ञानामुळेच मिळतो. म्हणून त्याने संन्यास घेऊन ब्रह्मज्ञानाच्या प्राप्तिसाठी साधना केली पाहिजे. लौकिक जीवनाशी संबंध तोडणे, स्वतःत पूर्ण बाणवणे, सत्य, अहिंसा, अस्तेय इत्यादिकांचे पालन करणे. शरीर आणि प्राण ब्रह्मज्ञानप्राप्तीसाठी आवश्यक असल्यामुळे ते टिकतील एवढेच अन्न ग्रहण करणे. शरीर हे ब्रह्मज्ञानप्राप्तीचे साधन असल्यामुळे ते शुद्ध ठेवणे, काम्य कर्मे निषिद्ध मानणे, या गोष्टींना भारतीय संन्यासकल्पनेत महत्त्वाचे स्थान आहे.

टिळकांच्या मनात संन्यास धारण करण्याचा विचार का आला हे आता आपणास पाहिले पाहिजे. भारताच्या उन्नतीसाठी ख्रिस्तस्वीकृती आवश्यक, तसेच भारतीयांमध्ये ख्रिस्त रुजविण्याच्या पाश्चात्त्य मिशनऱ्यांच्या पद्धतीबद्दल असमाधान, युरोपीय रूपातील ख्रिस्ताच्या स्वीकाराऐवजी पौर्वात्य ख्रिस्ताचा शोध व स्वीकृती, त्याबरोबरच स्वदेशी चर्चची उभारणी आवश्यक, अशी टिळकांची भूमिका असल्याचे आपण यापूर्वीच पाहिले. आम्हा भारतीयांना विचारांवर नव्हे तर व्यक्तींवर श्रद्धा ठेवण्याची सवय आहे; श्रद्धेय व्यक्ती सांगते म्हणून त्याने सांगितलेला विचार आचरणात आणायचा, ही आम्हा भारतीयांची पद्धत आहे; म्हणून प्रथम येशूचे अलौकिक जीवन भारतीयापर्यंत पोचविले पाहिजे आणि नंतर त्याच्या आधारे येशूचा विचार सांगितला पाहिजे; थोडक्यात, भारतात ख्रिस्तविचार जर रुजवायचा असेल तर बायबलमध्ये काय सांगितले आहे यावर भर देण्यापेक्षा येशू ख्रिस्ताने काय सांगितले आहे यावर भर दिला पाहिजे, असे टिळकांना वाटत होते. भारताला ख्रिस्ती धर्माच्या आधी ख्रिस्ताची गरज आहे; आणि येशू भारतीय माणसापर्यंत पोचविण्यासाठी आपण 'प्रेषित' (अपॉस्टल या अर्थी) म्हणून निवडले गेलो आहोत; आता हे आपले आयुष्यभराचे कार्य आहे; असा साक्षात्कार टिळकांना होऊ लागला. आपणच स्थापन केलेल्या 'देवाचा दरबार' या संस्थेद्वारे आपण मानवावर प्रेम करीत, त्याची सेवा करीत ख्रिस्त सामान्य भारतीयापर्यंत पोचवला पाहिजे, त्यासाठी आपण आपल्या वैयक्तिक ऐहिक जीवनाचा त्याग करून केवळ मानवासाठी जगले पाहिजे, असे टिळकांना वाटू लागले. जे. सी. विन्स्लो यांनी म्हटले आहे की, टिळकांना असे वाटू लागले की, भारताला ख्रिस्तत्वाची नव्हे तर ख्रिस्ताची गरज आहे. भारताला भारतीय 'अपॉस्टल' ची गरज आहे. देव आपल्याला 'भारतीय प्रेषित' होण्यासाठी बोलवत आहे, असे त्यांना अधिकाधिक प्रमाणात वाटू लागले. "मी महाराष्ट्राचा 'तुकाराम' म्हणून निवडला गेलो आहे." असे ते म्हणू लागले. तुकाराम आणि सेंट पॉल यांचे संयुग म्हणून जणू ते निवडले गेले होते. आपल्याला हजारो अनुयायी मिळतील आणि भारतीयत्वाच्या धर्तीवर आपण भारतीय चर्च उभे करू शकू, असा विश्वास त्यांना वाटू लागला. येशू आपणांस, त्यांनी पुरस्कारिलेल्या दारिद्र्याच्या आणि साध्या जीवनपद्धतीच्या वाटेने आणि भारतीय संतांना ज्या संन्यासमार्गाचे आकर्षण होते त्या मार्गाने चालण्यासाठी बोलवीत आहे; असा ख्रिस्ताचा साक्षात्कार त्यांना ऑगस्ट १९४७ मध्ये झाला.[१८] लक्ष्मीबाईंनी जरी अशा साक्षात्काराचा उल्लेख केला नसला तरी त्यांनी, या सुमारास 'टिळकांच्या अंतःकरणात मोठी खळबळ उडून राहिल्याचा' निर्देश केला आहे.[१९] ख्रिस्ताकडून आपण विशिष्ट कार्यासाठी निवडले गेलो आहोत असा साक्षात्कार झाल्यानंतर त्यांनी संन्यास घेण्याचा निर्णय घेतला. ६ सप्टेंबर १९१७ च्या ज्ञानोदयात


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

त्यांनी पुढील विज्ञापन जाहीर केले. ते म्हणतात, 'माझ्या देशाप्रीत्यर्थ, ख्रिस्ताच्या दरबाराप्रीत्यर्थ मला प्रेम आणि सेवा यांचे अनुबंध शिवाय करून अन्य रीतीने कोणत्याही मानवी संस्थेचा बांधलेला राहता येणार नाही. माझा यापुढे सर्व हेतूस्तव, सारा हितसंबंध ख्रिस्ताशी व शुभवर्तनाशी असला पाहिजे. म्हणून देवाच्या वाणीला मान देऊन मी आजपासून मिशनचा किंवा दुसऱ्या कोणत्याही मानवी संस्थेचा आश्रित किंवा वेतन घेऊन काम करणारा चाकर नाही. मी एक ख्रिस्ती संन्यासी म्हणजे विरागाच्या नव्हे - तर अनुरागाच्या मागे जाणारा संन्यासी आहे. मला आजपासून देव जो आत्मा तो सांगेल तसा होण्याचे व तो सांगेल ते करण्याचे प्रयत्न करावयाचे आहेत.'"[१०]

ना. वा. टिळकांच्या ह्या 'विज्ञापना'वर भारतीय अध्यात्मविचाराची छाया जाणवते. येथे त्यांनी आपल्या आत्म्याला 'देव' म्हटले आहे. लौकिक बंधनांपासून मुक्त होऊन केवळ परमेश्वराशी बांधून घेणे; केवळ आत्म्याची आज्ञा मानणे; या कल्पनांवरही भारतीय अध्यात्म-विचाराची छाया आहे. भारतीय संन्यासकल्पनेत या गोष्टी पायाभूत मानल्या जातात.

संन्यास धारण केल्यावर त्यांनी आपल्या हृदयातील येशू जागृत करण्याची साधना सुरू केली. आपण 'टिळक' ही व्यक्ती उरू नये त्याऐवजी आपण स्वतः 'येशू' बनले पाहिजे, असे त्यांना वाटू लागले आणि या दिशेने त्यांची वाटचाल सुरू झाली. याचा अर्थ त्यांना येशूशी प्रथम सरूपता आणि शेवटी सायुज्यता प्राप्त करून घ्यायची होती. टिळकांच्या अभंगांत त्यांच्या या साधनेचे चित्र उमटले असून आपण त्याचा सविस्तर विचार पुढे करणार आहोत. संन्यास घेतल्यानंतरचा टिळकांचा दिनक्रम लक्ष्मीबाईंनी पुढीलप्रमाणे दिला आहे. 'टिळकांनी पगार घेण्याचे सोडले. एक प्रकारचा संन्यास घेतला. ते अंगात कफनी घालू लागले. त्यांच्या दोनच कफन्या असत व त्या ते स्वतः हाताने धूत. घरातसुद्धा आता नोकरचाकर कोणी नव्हते. अगदी चूल-पोतेऱ्यापासून ते स्वतः करीत.' 'पैशाच्या अभावामुळे टिळक भगव्या कफन्या घालू लागले. कारण त्यामुळे धोब्याचा खर्च वाचला. त्या कफन्याही त्यांनी जुन्या धोतराच्या बनवल्या होत्या.' "...टिळक घराला कड्या लावू देत नसत. कुलूप तर नाहीच नाही. मी म्हणे 'असे कसे करता?' ते म्हणत, 'खरोखर परमेश्वरावर आपला इतका भाव असला पाहिजे की, आपल्याला काही साठवून ठेवण्याची इच्छाच होता कामा नये व आपले जे असेल ते साऱ्यांचे असले पाहिजे. तुझे माझे हा भेदभाव काही उपयोगी नाही.'" "...टिळकांचा तापट स्वभाव, राग जवळजवळ नाहीसे झाले होते. आता रागाची जागा कीव घेई. कोणी काही विरुद्ध बोलले किंवा छळ होऊ लागला तर ते म्हणत, 'वाः, ह्या गोष्टी तर मला माझ्या कामात स्फूर्ती देतात.' ...मात्र त्यांना सात्त्विक संताप अतिशय येई. स्वतःचा अपमान झाला म्हणून ते रागवत नसले तरी हिंदी ख्रिस्ती लोकांतील कित्येक दुर्गुणांची, तसेच मिशनरींनी त्यांना आणलेल्या पांगळेपणाची त्यांना अत्यंत चीड येई." 'केरपोतेऱ्यापासून टिळक आता घरातले सर्व काम माझ्या बरोबरीने करीत. ते म्हणत ख्रिस्ताला कोठे चाकर नोकर होते. त्याला कुठे घरे माड्या होत्या, त्याला डोके टेकायलासुद्धा जागा नव्हती मग आपल्याला कशाला हे चोचले पाहिजेत?'[११] "ते आता एकच वेळेस जेवीत. कधी कधी तेही वर्ज्य करीत. जेवायला बसले की, एखादे वेळेस त्यांचा कंठ दाटून येई. ते म्हणत, 'माझे आप्तमित्र अन्नाला महाग झालेले पाहून मी हे अन्न खाऊ तरी कसे? ह्यापेक्षा दे ते माझ्या भुकेल्या बंधुभगिनींना.' घरात असेल नसेल ते पीठ मीठ ते गरजू लोकांना वाटू लागले."[१२]

टिळकांच्या या संन्यासामध्ये भारतीय संन्यास-धर्माच्या अनेक गोष्टी अंतर्भूत आहेत. मोक्षमार्गातील सरूपता, सायुज्यता या अवस्था, या अवस्था साधण्यासाठी भजन-कीर्तनासारखे मार्ग, कफनीसारखे वस्त्र, शरीर अस्तित्वात राहील एवढेच त्याचे पोषण, अपरिग्रह, अस्तेय ही मूल्ये, या गोष्टी टिळकांनी स्वीकारल्या आहेत. त्या स्वीकारण्याला ख्रिस्तवचनांत आधारही आहे. परंतु या संन्यासांचे साध्य मात्र वैयक्तिक मोक्ष नसून ख्रिस्ती धर्मानुसार मानवजातीवर प्रेम करणे आणि त्याची सेवा करणे हे आहे. याचा स्पष्ट उल्लेख त्यांनी 'ज्ञानोदया'मध्ये प्रसिद्ध केलेल्या विज्ञापनात केला आहे. भारतीय संन्यास-धर्मातील स्वीकृत गोष्टी त्यांनी ख्रिस्ती उद्दिष्टाभिमुख बनवल्या आहेत. म्हणूनच 'खरोखर परमेश्वरावर आपला इतका भाव असला पाहिजे की, आपल्याला काही साठवून




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
अनुक्रमणिका
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

ठेवण्याची इच्छाच होता कामा नये,' या अपरिग्रहाशी त्यांनी 'आपले जे असले ते साऱ्यांचे असले पाहिजे. तुझे माझे हा भेदभाव काही उपयोगी नाही,' हा समतेचा आणि सेवाभावाचा ख्रिस्ती विचार जोडला. आपण जो संन्यास घेत आहोत तो भारतीय संन्यासापेक्षा वेगळा आहे याची त्यांना स्पष्ट जाणीव आहे. त्यांना वैयक्तिक ब्रह्मज्ञान-प्राप्तीवर नव्हे तर सामाजिक जीवनावर आपल्या सर्व शक्ती केंद्रित करायच्या आहेत. ज्या गोष्टी वैयक्तिक जीवनाचा आधार आहेत आणि ज्यांच्यामुळे वैयक्तिक जीवन सुखी व समृद्ध होते त्या गोष्टींचा त्याग केल्याशिवाय मानवाला प्रेम देण्यावर आणि त्याची सेवा करण्याकडे आपल्याला आपल्या शक्ती वळवता येणार नाहीत. परंतु जोपर्यंत जीवन आहे तोपर्यंत जगण्यासाठी कर्मे करावी लागणार. त्यासाठी काही प्रमाणात का होईना धन लागणार. या कर्मांचे स्वरूप कसे असावे आणि जगण्यासाठी आवश्यक असलेले धन कसे व कोणत्या प्रमाणात मिळवावे याची निश्चिती त्यांनी ख्रिस्ती मूल्यांच्या आधारे केली आहे. आपल्या मित्राला पाठवलेल्या एका पत्रात टिळकांनी आपली ख्रिस्ती संन्यासाबद्दलची मांडलेली भूमिका थोडक्यात पुढीलप्रमाणे सांगता येईल.

१. ख्रिस्ती संन्यास म्हणजे पत्नीचा त्याग नव्हे; कारण 'जे देवाने जोडले ते माणसांनी तोडू नये.' अशी प्रभूची स्पष्ट आज्ञा आहे. पत्नीविषयक प्रेमाशी संबद्ध असलेल्या कामाचा त्याग करणे हा पहिला संन्यास होय. त्यासाठी उभयतांचे सहकारित्व आवश्यक आहे. २. संन्याशासाठी गृहत्याग आवश्यक नाही. कुटुंबाच्या योगक्षेमासाठी तो करीत असलेल्या धार्मिक-सामाजिक कामाची मजुरी त्याने घेतली पाहिजे. जे ईश्वराचे काम संन्यासी करतो त्याचा योग्य मोबदला त्याला मिळायला हवा. कारण 'कामकरी मजुरीस योग्य आहे,' असे ख्रिस्तवचन आहे. प्रभू हाच मालक असून तोच कामकऱ्यास मजुरी देतो. तो कामाच्या महत्त्वाप्रमाणे जगाकडून कामकऱ्यास मजुरी देववतो. केवळ ईश्वरचिंतन हे ते काम नव्हे. जगाची सेवा करण्याबद्दलची ही मजुरी आहे. संन्याशाने भिक्षा मागू नये; हक्काची मजुरी मागावी. 'भिक्षापात्र अवलंबिणे। जळो जिणे लाजिरवाणे।।' ख्रिस्ती संन्याशाने हे कदापिही करू नये. संन्याशाने केवळ पोटाला-कुटुंबाला पुरेल एवढीच मजुरी घ्यावी. त्याने धनसंग्रह करू नये. त्याला जर अधिक दिले गेले तर ते त्याने जगाला परत केले पाहिजे. ३. वैयक्तिक अध्यात्मसाधना आणि मानवावर प्रेम करीत त्याच्या हितार्थ त्याची सेवा करणे हे संन्यासधर्माचे उद्दिष्ट आहे. वैयक्तिक अध्यात्मसाधनेमुळे ख्रिस्तवचनांचे पालन करण्यास प्रेरणा मिळते. ख्रिस्ताच्या अनुसरणातच मोक्ष आहे. त्यासाठी प्रथम ख्रिस्तासारखे बनले पाहिजे आणि नंतर स्वतःच ख्रिस्तरूप झाले पाहिजे.[१३] म्हणजेच सरूपता आणि सायुज्यता प्राप्त करून घेणे हा संन्याशाच्या साधनेचा अपरिहार्य भाग आहे. थोडक्यात, टिळकांनी आपल्या संन्यासकल्पनेत ऐहिक जीवनापासून अध्यात्म तोडले नाही. ख्रिस्ती धर्मातील ऐहिक जीवनाभिमुखता त्यांनी कटाक्षाने सांभाळली. म्हणूनच त्यांनी आपल्या ख्रिस्ती संन्यासाला विरागाचा नव्हे तर 'अनुरागाचा' संन्यास म्हटले आहे.

भारतात ख्रिस्त रुजवण्यासाठी त्यांनी 'देवाचा दरबार' ही संस्था स्थापन केली. येशूचा संदेश सामान्य माणसापर्यंत पोचवणे हे या संस्थेचे उद्दिष्ट होते. केवळ ख्रिस्ती माणसालाच नव्हे तर ख्रिस्ती नसलेल्यासही या संस्थेचे सभासद होता येई. या संस्थेच्या स्वाराज्य-प्रचारकास (स्वाराज्य म्हणजे देवाचे राज्य) जी शपथ घ्यावी लागत असे तिच्यात संन्यास आणि सरूपता आणि सायुज्यता या मोक्षविषयक संकल्पना अनुस्युत आहेत. या संस्थेच्या घटनेत म्हटले आहे की, '*स्वाराज्यप्रचारक:* ज्याला संन्यासवृत्तीला साजेल अशीच राहणी प्रिय आहे आणि ज्याने ख्रिस्ताला असे वचन दिले आहे की, - तुझ्यासारखा - (१) दरिद्री राहीन, (२) तुझ्यासारखी सेवा करीन, (३) तुझ्यासारखा निर्वैर असेन, (४) तुझ्यासारखा खांबाला खिळला जाण्यास सिद्ध राहीन, (५) तुझ्यासारखा देवाच्या इच्छेची परिपूर्ती करायला झटेन, (६) तुझ्यासारखे मनुष्यमात्रावर प्रेम करीन, (७) मी श्रद्धेने बलाने तुझ्यासमीप असेन, तुझे माझे जग एक करीन, तुझे माझे रूप एकसारखे व्हावे म्हणून झटेन व शेवटी तुझ्याशी युक्त होऊन 'तुम्ही मेला आहा, व तुमचे जीवित ख्रिस्तासह देवाचे ठायी प्रच्छन्न आहे,' हे साधुवर्य पौल यांचे म्हणणे स्वानुभवाने खरे करीन. असा पुरुष किंवा स्त्री देवाच्या



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

दरबाराचे स्वाराज्यप्रचारक होतील.[४४] टिळकांच्या स्वाराज्यप्रचारकाच्या या कल्पनेमध्ये समीपता; सरूपता व शेवटी सायुज्यता हा भारतीय मोक्षकल्पनेतील क्रम कायम ठेवला आहे.

ख्रिस्ती धर्माचे वेगळेपण राखीतच ह्या धर्माला भारतीय आध्यात्मिक परंपरेच्या चौकटीत आणण्याचा टिळकांचा प्रयत्न होता. केवळ धर्मालाच नव्हे तर ख्रिस्ती धर्मातील विवाहासारख्या विधींनाही त्यांनी भारतीय परंपरेचे रूप दिले. आपल्या मुलाच्या, देवदत्त टिळकांच्या विवाहाच्या निमित्ताने त्यांनी एक विवाहपद्धती तयार केली. तिच्यात त्यांनी भारतीयत्व आणि ख्रिस्तत्व यांचे एक संयुग घडवून आणले. ह्या विवाहविधीत काही मंत्रांसाठी मराठीबरोबर संस्कृत भाषाही वापरली आहे. तसेच या विधीत मोठ्या प्रमाणात गेय पद्याची योजना केली आहे. येथे काव्याचे प्रयोजन काय, असा प्रश्न कदाचित उपस्थित होईल या कल्पनेने त्यांनी या काव्याचे पुढीलप्रमाणे समर्थन केले आहे. ते म्हणतात : "धर्मविधीत काव्यगान काय करायचे असे कोणी म्हणेल, तर त्यालाही आम्ही सांगतो की, वाटेल तर या विवाहपद्धतीतले सारे काव्यगान तुम्ही वगळा. स्वतः आम्ही मात्र तसे कदापि करणार नाही. कारण आम्ही हिंदी आहो. आमचा धार्मिकपणा काव्यगानाने जितका उत्तेजित होतो तसा दुसऱ्या कशानेही होणे शक्य नाही. आम्हाला वाटते आमच्या देशाची वृत्ती अजूनपावेतो हीच आहे. विशेषतः ज्यात ऐहिक पारमार्थिक अभिन्न होत आहेत, अशा मधुर मंगल विवाहविधीत तर काव्यगानाला प्राधान्यच दिले पाहिजे. ...'जे नाही इंग्लिश ते अवघे हीदनीश !' म्हणणारी थोडीशी हिंदी ख्रिस्ती माणसे आम्हांला भेटली आहेत. त्यांच्याकरिता आम्ही काहीच करीत नसतो, फक्त दुर्जनं प्रथम वंदे!"[४५] त्यांच्या या भाष्यातून स्वदेशाभिमान आणि सांस्कृतिक अस्मिता प्रखरपणे प्रकट झाली आहे. एवढेच नव्हे तर पाश्चात्त्य रीतीरिवाज पाळणाऱ्या आणि स्वतःच्या परंपरेला 'रानटी' मानणाऱ्या हिंदी ख्रिश्चनांच्या इंग्लिशधार्जिणेपणावर त्यांनी कठोर प्रहारही केला आहे. ख्रिस्ती विवाह हा कराराच्या स्वरूपाचा आहे तर हिंदू विवाह हा संस्कार आहे. टिळकांनी आपल्या पद्धतीत त्याचे कराराचे स्वरूप कायम ठेवले आहे. त्याबरोबरच त्यांनी या विवाहपद्धतीत भारतीय परंपरेतील मंगलाष्टक, पाणिग्रहण, सप्तपदी, मंगलसूत्र-बंधन हे विधीही अंतर्भूत केले आहेत. या विधींचे रूप भारतीय परंपरेचे स्मरण करून देणारे असले तरी त्याचा आशय मात्र ख्रिस्ती धर्माचा आहे. सप्तपदीच्या विधीत प्रत्येक पाऊल टाकताना वधूवरांनी आपण वैवाहिक जीवन कसे जगू यासंबंधी द्यावयाच्या आश्वासनांत त्यांनी ख्रिस्ती मूल्ये गुंफली आहेत. उदाहरणार्थ, वधूसमवेत पाऊल टाकताना वर दोघांच्या वतीने 'चतुर्थ पदविन्यासा करी माझ्यासवे चल। अतिथींना, अनाथांना संतर्पू आश्रयाचल।।' असे आश्वासन देतो. वधूसाठी 'सहचारिणी' ऐवजी 'सहधर्मिणी' ही संज्ञा योजून, 'शुभ लग्न सावधान' या शब्दांचा वेगळा, ख्रिस्ती अर्थ लावून, मंगलसूत्रबंधनाला अंगठी घालण्याचा पर्याय ठेवून आणि केवळ तीन तांदुळाच्या अक्षता मंगलाष्टकांच्या अखेरीस टाकण्याचे बंधन ठेवून त्यांनी भारतीय परंपरेच्या चौकटीतच ख्रिस्ती विधींचे वेगळेपण प्रस्थापित केले आहे. या विवाहविधीत त्यांनी काही भारतीय - खरे म्हणजे मराठी - लग्नविधींतील काही विधींच्या रूपांशी ख्रिस्ती आशयाचे संयुग घडवून आणले आहे.[४६]

परकीय संस्कृतीतून आलेल्या गोष्टींचा स्वाभाविकपणे आणि नैसर्गिकरीत्या स्वीकार कसा केला जातो याचे उत्तम उदाहरण म्हणजे टिळकांचे मृत्यूपत्र. त्यांचे मृत्यूपत्र पूर्ण रूपात जरी मिळू शकले नाही तरी 'स्मृतिचित्रा'त आलेला भागही या दृष्टीने पुरेसा बोलका आहे. त्यात त्यांनी पुढील विचार आणि इच्छा प्रकट केल्या आहेत. १. स्वर्ग व नरक या दोन अवस्था असून आत्मा या दोहोंतून एका अवस्थेप्रत जातो असे माझे मत आहे. २. देवाज्ञेला मी कधीही 'मृत्यू' म्हणणार नाही; कारण ती देवाची आज्ञा आहे. ती नवजीवनजागृती आहे. ३. आपल्या मृत्यूनंतर आपल्या शरीराचे दहन करावे, प्रेतयात्रेच्या वेळी काळा रंग वर्ज्य करावा.[४७] मृत्युपत्रातील या विचारांवर आणि इच्छांवर भारतीय संवेदनशीलतेची दाट छाया आहे. आत्मा आणि परब्रह्म एकच असल्याचे ज्ञान झाले की साधकास जिवंतपणीच मोक्ष प्राप्त होतो, या भारतीय आध्यात्मिक विचाराचा संस्कार त्यांच्या स्वर्ग-नरक यासंबंधीच्या भूमिकेवर झाला आहे. येशूच्या आज्ञांचे पालन केले, की या जीवनातच स्वर्ग प्राप्त होतो, असे

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

टिळकांचे म्हणणे आहे. मृत्यू हा मंगल असून ती 'देवाज्ञा' आहे, ही श्रद्धा भारतीय अध्यात्मपरंपरेत चालत आलेली आहे. टिळकांना मृत्यू शुभ वाटत असल्यामुळेच त्यांनी प्रेतयात्रेच्या प्रसंगी काळा रंग वर्ज्य करण्याची इच्छा व्यक्त केली आहे. टिळकांनी व्यक्त केलेल्या दहनाच्या इच्छेबद्दल अ. दे. टिळक म्हणतात : 'ख्रिस्ती लोकांत दफनाची प्रथा असली तरी दहन निषिद्ध नाही. डॉ. ह्यूम यांचे व टिळकांचे व्याही कृष्णराव सरोदे यांचेही दहनच करण्यात आहे. या दहनावरून कल्पनेच्या कितीतरी वावड्या उडविण्यात आल्या. टिळकांना ख्रिस्ती झाल्याचा पश्चात्ताप झाला होता. शेवटी शेवटी टिळक स्वतःला ख्रिस्ती म्हणवीत नव्हते, असले तर्ककुतर्कही कित्येकांनी काढले.'[४८] हे अ. दे. टिळकांचे म्हणणे जरी खरे असले तरी टिळकांनी दहनविधीच्या केलेल्या निवडीमागे भारतीय सांस्कृतिक संवेदनशीलता असल्याचे दिसून येते. कारण त्यांच्या ख्रिस्ती धर्माच्या पौर्वात्यीकरणाच्या संदर्भात त्यांनी केलेली दहनविधीची निवड सुसंगतच आहे. परंतु या दहनविधीच्या आधारे 'टिळकांना ख्रिस्ती झाल्याचा पश्चात्ताप झाला होता' असा निष्कर्ष काढणे हे त्यांच्या एकूण धर्मविचारांशी आणि त्यांच्या विचारांती घेतलेल्या ख्रिस्तस्वीकृतीमागील भूमिकेशी सुसंगत ठरत नाही. त्यांची ख्रिस्तभक्ती निर्विवाद असल्याचे त्यांच्या अभंगरचनेवरूनही लक्षात येते. त्यांची ख्रिस्तावरील श्रद्धा इतकी अचल होती की, आयुष्यभरातील त्यांच्या आचारविचारांत तसेच ख्रिस्ती धर्माला भारतीय संस्कृतीच्या कक्षेत आणण्याच्या त्यांच्या प्रयत्नात त्यांनी कोठेही ख्रिस्तानुसरण सोडलेले आढळत नाही.

भारतीय संस्कृतीने घडवलेल्या संवेदनशीलतेच्या चौकटीत परसंस्कृतीकडून आलेल्या ख्रिस्ती धर्माचा स्वीकार ना. वा. टिळकांनी कसा केला हे आपण विस्ताराने पाहिले. टिळकांची ख्रिस्ती धर्माच्या 'भारतीय' रूपाची संकल्पना सूत्ररूपाने मांडण्यासाठी लक्ष्मीबाई टिळकांच्या एका भाषणाचा आधार घेतला पाहिजे. टिळकांच्या निधनानंतर चोवीस वर्षांनी नागपूर येथे भरलेल्या ख्रिस्ती साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून लक्ष्मीबाईंनी मांडलेली भूमिका ना. वा. टिळकांच्या भूमिकेचा सुसंगत विस्तारच आहे. या भाषणात लक्ष्मीबाईंनी पुढील विचार मांडले आहेत. १. ख्रिस्ती आणि हिंदू 'दोघेही हिंदीच, दोघांचे पूर्वज हिंदीच, दोघांचाही इतिहास हिंदीच, दोघांनाही एकाच भूमीने तोलून धरले आहे... दोघेही आपल्या मायभूमीने पैदा केलेले अन्न खात आहेत.'[४९] २. हिंदू वाङ्मयाचा अभ्यास केल्याशिवाय काही मराठी वाक्प्रचार सुद्धा कळणे अशक्य. म्हणून 'आपल्या वाङ्मयाची वाढ करून घ्यावयाची असेल तर हिंदू वाक्प्रचाराविरुद्ध किंवा पुराण वाङ्मयाविरुद्ध वृत्ती ठेवून चालणार नाही.'[५०] ३. "आपल्या प्रभूने सांगितलेले आहे की, 'मी (कोणाचे) भविष्यशास्त्र किंवा नियमशास्त्र रद्द करण्यास आलो नाही. मी ते पूर्ण करण्यास आलो आहे." हे येशूवचन घेऊन लक्ष्मीबाईंनी ग्रीस देशाने ख्रिस्ती धर्म स्वीकारल्यावरही, आता आपला परंपरेने चालत आलेला धर्म पूर्ण झाला आहे असे मानून आपल्या प्राचीन देवदेवतांची पुराणेही त्याज्य न मानता ती कशी जतन केली हे उदाहरण देऊन ह्याच प्रकारे येथील पुराणे भारतीय ख्रिश्चनांनीही आपला ऐतिहासिक ठेवा आणि धर्मव्यतिरिक्त वाङ्मय म्हणून स्वीकारली पाहिजेत, असे मत मांडले. त्या म्हणतात : 'ग्रीक-लॅटिन पुराणांना जितके महत्त्व देण्यात येते तितकेच किंवा आपले म्हणून त्याहूनही अधिक महत्त्व हिंदू पुराणांना देण्यात आले पाहिजे.'[५१] ४. 'दसरा, पोळा, वर्षप्रतिपदा, संक्रांत वगैरे धर्मभेदातीत ठेवता येण्यासारखे सण ख्रिस्ती लोकांना उचलण्यास हरकत' नाही."[५२] ५. ख्रिस्ती मुलांना हिंदी नावे देण्यास प्रत्यवाय नसावा."[५३]

लक्ष्मीबाईंची हिंदूंच्या पुराणादी गोष्टींसंबंधीची भूमिका टिळकविचारांशी जोडून आपणास टिळकांची 'भारतीय' ख्रिस्ती धर्माबद्दलची संकल्पना पुढीलप्रमाणे मांडता येईल.

१. ख्रिस्ती धर्म हा हिंदू धर्माला पूर्णत्व देणारा धर्म आहे. हे म्हणताना त्यांना पौर्वात्य रूपातील ख्रिस्ती धर्म अभिप्रेत असावा. २. त्यामुळे हिंदू पुराणे ख्रिश्चनांनी त्याज्य मानण्याचे कारण नाही. भारतीय संस्कृतीतील प्राचीन वाङ्मयाचा ठेवा या नात्याने या पुराणांशी त्यांनी संबंध ठेवला पाहिजे. ३. भारतीय संतांचे साहित्य हा भारतीय ख्रिस्त्यांचा 'जुना करार' आहे. ४. उपासनेसाठी ख्रिस्त्यांनी भारतीय आध्यात्मिक परंपरेचा भाग असलेला

अनुक्रमणिका




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आणि संतांनी स्वीकारून विकसित केलेला भक्तिमार्ग अवलंबिला पाहिजे. भक्तिमार्ग हा स्वत:ला येशूरूप बनविण्याचे प्रभावी साधन आहे. ५. त्यासाठी त्यांच्या दैनंदिन जीवनात भजन, कीर्तन आणि ख्रिस्तपुराणाच्या श्रवणपठणास स्थान असले पाहिजे. ६. हिंदू धर्माशी संलग्न नसलेल्या परंतु भारतीय संस्कृतीचा भाग असलेल्या गोष्टी ख्रिश्चनांनी स्वीकारल्या आणि टिकवल्या पाहिजेत. ७. ख्रिश्चनांचा फक्त धर्म वेगळा आहे. ते भारतीय असून त्यांचे जीवन भारतीय संस्कृतीने घडवलेले आहे. ख्रिस्ती धर्माच्या आचरणाद्वारे त्यांनी भारतीय संस्कृती अधिक समृद्ध केली पाहिजे. ख्रिस्तस्वीकृतिप्रक्रियेत ना. वा. टिळकांच्या संवेदनशीलतेचे स्वरूप बदलले. भारतीय संस्कृतीने घडवलेली संवेदनशीलता पुसून त्या जागी ख्रिस्ती संवेदनशीलता त्यांनी प्रस्थापित केली नाही. भारतीय संस्कृतीने घडवलेल्या संवेदनशीलता आणि ख्रिस्ती मूल्ये यांच्या संयुगातून त्यांची नवी संवेदनशीलता तयार झाली. हे घडत असतानाच त्यांनी भारतीय संस्कृतीच्या चौकटीतच ख्रिस्ती धर्माला एक वेगळे रूप मिळवून देण्याचा प्रयत्न केला. त्यांच्या बाबतीत घडलेली ही प्रक्रिया परसंस्कृतीकडून आलेल्या गोष्टींच्या स्वीकाराची जी नैसर्गिक आणि स्वाभाविक पद्धती असते तिला अनुसरूनच होती.

आता आपणांस याच संदर्भात त्यांच्या कवितेचा विचार करावयाचा आहे.

३

ना. वा. टिळकांनी विपुल काव्यलेखन केले आहे. त्यांच्या मृत्यूनंतर त्यांच्या कवितांची जी मोजदाद करण्यात आली त्यात सामान्यपणे त्यांच्या अठराशेवर कविता सापडलेल्या आहेत.[५४] परंतु त्यांची मोजकीच स्फुट कविता आतापर्यंत प्रकाशित झाली आहे. रे. भास्करराव उजगरे यांनी संपादित केलेली 'टिळकांची कविता, भाग १', आणि ज्यात 'अभंगांजली' आहे ती 'टिळकांची कविता, भाग-२', टिळकांची बालगीते असलेली 'टिळकांची कविता, भाग-३' आणि टिळकांच्या एकूण काव्यातून अ. दे. टिळकांनी निवडलेल्या आणि संपादित केलेल्या १३९ वेच्यांचा संग्रह 'टिळकांची कविता, भाग-४', असे हे त्यांचे स्फुट काव्याचे संग्रह आहेत. यांपैकी टिळकांची 'अभंगांजली' अ. दे. टिळकांनी नव्याने संपादित करून १९५९ मध्ये प्रकाशित केली. याशिवाय दे. ना. टिळकांनी संपादित केलेले टिळकांचे 'वनवासी फूल' हे दीर्घ काव्य आणि टिळकांचे अपूर्ण असलेले व नंतर लक्ष्मीबाईंनी व दे. ना. टिळकांनी पूर्ण केलेले 'ख्रिस्तायन' हे काव्यबद्ध येशूचरित्र हेही प्रकाशित झालेले आहे. 'भजनसंग्रह' आणि 'उपासनासंगीत' यांत त्यांचे धार्मिक स्फुट काव्य समाविष्ट केले गेले आहे. ख्रिस्ती धर्माचा स्वीकार करण्यापूर्वी त्यांची हिंदू देवदेवतांवर आणि साधुपुरुषांवर काही आध्यात्मिक काव्ये प्रसिद्ध झाली होती. परंतु ती आज उपलब्ध नाहीत. ते शीघ्र कवी असल्याने ते आपल्या डायरीत अनेक व्यावहारिक बाबीही पद्यात लिहीत. या काव्याला केवळ 'ऐतिहासिक महत्त्व' असल्यामुळे ते 'प्रकाशित होण्याचा संभव नाही', असे दे. ना. टिळकांनी म्हटले आहे.[५५] असे असले तरी जिला काव्यमूल्य आहे अशी त्यांची खूपशी कविता अद्याप असंगृहित असून ती वाचकांसमोर येणे आवश्यक आहे. विपुल काव्यलेखनाशिवाय त्यांनी 'ज्ञानोदय' या ख्रिस्ती नियतकालिकात असेच विपुल गद्यलेखनही केले आहे. याशिवाय त्यांची काही भाषणेही आहेत. कदाचित इतर नियतकालिकांतूनही त्यांनी सामाजिक-राजकीय प्रश्नांवर लेख, पत्रे लिहिलेली असू शकतील. परंतु त्यांचे हे सर्व गद्य ग्रंथरूपाने संगृहित झालेले नाही. त्यांचे गद्यलेखन हा महाराष्ट्राच्या धार्मिक-सांस्कृतिक इतिहासाचा महत्त्वाचा भाग आहे. म्हणून ते समग्र रूपात प्रसिद्ध होणे आवश्यक आहे.

ना. वा. टिळकांना अध्यात्माबरोबरच सामाजिक व राजकीय सुधारणांतही रस होता. भारतीय समाजातील विषमता नष्ट होऊन तो एकात्म व्हावा, भारताला स्वराज्य मिळावे, भारतात समाजसुधारणेचे व राष्ट्रबांधणीचे कार्य केवळ धर्मद्वारेच शक्य असल्याने त्यासाठी नव्या धर्माची स्थापना व्हावी, असे त्यांना वाटत असल्याचे आपण यापूर्वीच पाहिले आहे. पारलौकिक सुखार्थ केली जाणारी परंतु वैराग्यावर उभी असलेली वैयक्तिक अध्यात्मसाधना आणि त्यांना हवी असणारी लौकिक जीवनातील सुधारणा या दोन गोष्टींचा सुसंवाद


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

हिंदूधर्मविचारात साधला जाणे अशक्य होते. ख्रिस्ती धर्म, माणसाच्या मुक्तीसाठी परमेश्वराची उपासना करणे जेवढे आवश्यक मानत होता तेवढेच मानवाच्या लौकिक जीवनात सुख व शांती यासाठी कार्य करणेही आवश्यक मानत होता. ख्रिस्तीधर्मस्वीकारामुळे टिळकांच्या या दोन जीवनोद्दिष्टांत सुसंवाद साधला गेला. म्हणून त्यांच्या बाबतीत ख्रिस्ती धर्मस्वीकार अपरिहार्यच होता, असे म्हणावे लागते. आयुष्याच्या उत्तरार्धात त्यांनी घेतलेल्या 'अनुराग संन्यासा'त ही दोन्ही उद्दिष्टे संयुक्त झाली आहेत. हिंदू असताना देवदेवतांची आणि साधुपुरुषांची स्तुती करणाऱ्या काव्यासोबत त्यांनी थोडेसे लौकिक जीवनावरही काव्यलेखन केले. परंतु लौकिक जीवनाला प्राधान्य देणारा ख्रिस्ती धर्म स्वीकारल्यानंतर मात्र त्यांच्या लेखनात लौकिक जीवनावरील काव्याला प्रधान स्थान मिळाले. त्यांनी आपल्या आयुष्याच्या उत्तरकाळात ख्रिस्ती अध्यात्मातून स्फुरलेले अभंग लिहिले. त्यांनी लिहिलेले अभंग आणि गीतस्वरूप असलेले उपासनाकाव्य मात्र ख्रिस्ती समाजापुरतेच सीमित राहिले.

त्यांची लौकिक जीवनावरील कविता ख्रिस्तप्रणीत जीवनमूल्यांवरील श्रद्धेतूनच निर्माण झाली आहे. ख्रिस्ती नैतिक मूल्ये ही तिची प्रमुख आशयसूत्रे आहेत. त्यांचे अभंग आणि उपासनागीते अ-ख्रिस्ती समाजाला जशी परकी वाटली तशी त्यांची लौकिक जीवनावरील कविता, ख्रिस्ती मूल्यांतून जन्मलेली असूनही, परकी वाटली नाही. किंबहुना या कवितेचा आशय 'ख्रिस्ती' आहे याची जाणीवही अ-ख्रिस्ती वाचकाला झालेली दिसत नाही. याच्या कारणांचा येथे विचार केला पाहिजे.

इंग्रजी राजवटीत मिळू लागलेल्या शिक्षणातून आणि इंग्रजी वैचारिक वाङ्मयातून ज्या आधुनिक पाश्चात्त्य जीवनपद्धतीचे आणि जीवनमूल्यांचे संस्कार नवशिक्षित वर्गावर झाले त्याचा पाया ख्रिस्तप्रणीत नैतिक मूल्येच होता. सामान्य माणसाचे प्रश्न घेऊन ते सोडवण्यासाठी प्रयत्न करणे, मानवाच्या विकासासाठी आणि कल्याणासाठी वेगवेगळ्या प्रकारच्या सार्वजनिक संस्था स्थापन करून व पोटाला चिमटा घेऊन त्या चालवणे, वैयक्तिक जीवनाला गौण स्थान देऊन किंवा संसाराच्या मोहात न पडता, विशिष्ट जीवनोद्दिष्टासाठी संपूर्ण आयुष्य व्यतीत करणे, या सर्वांच्या मागे मुळात ख्रिस्तप्रणीत असलेले मानवाबद्दलच्या प्रेमाचे आणि सेवावृत्तीचे मूल्य होते. आपल्या आयुष्याचे एक ध्येय ठरवून त्यासाठीच केवळ जगणारी किंवा एखाद्या संस्थेच्या कार्यात आपले आयुष्य घालविणारी माणसे या काळात निर्माण झाली. ही मिशनरी वृत्ती ख्रिस्ती धर्माकडूनच आलेली आहे. ख्रिस्ती मूल्ये हा ज्यांचा पाया आहे अशा प्रकारच्या अनेक गोष्टी भारतीयांनी स्वीकारल्या आणि आपल्या बनवून घेतल्या. एकोणिसाव्या शतकात भारतीय नवशिक्षित वर्गाच्या जीवनाला आणि दृष्टिकोणाला ख्रिस्ती मूल्यांच्या पायावर उभ्या असलेल्या पाश्चात्त्य मूल्यांच्या संस्कारामुळे नवे वळण लागले. याच नवशिक्षित वर्गातून या काळात लेखक आणि वाचक निर्माण झाले. त्यामुळे स्वाभाविकपणे या लेखकांच्या निर्मितिक्षम संवेदनशीलतेच्या जडणघडणीत ख्रिस्ती मूल्यांचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष वाटा होता. उदाहरणार्थ एकोणिसाव्या शतकाच्या उत्तरार्धात मराठी लेखक-कवींनी ज्या स्वातंत्र्य, समता, बंधुता या मूल्यत्रयींचा स्वीकार केला त्या मूल्यत्रयींपैकी समता आणि बंधुता या दोन मूल्यांची देणगी ख्रिस्ती धर्माकडून लाभलेली आहे. या काळातील लेखक-कवींवर प्रत्यक्षाप्रत्यक्षपणे ख्रिस्तप्रणीत मूल्यांचा कसा संस्कार झाला होता हे आपणांस केशवसुतांच्या कवितेवरून समजून घेता येईल. केशवसुतांच्या काव्यात वारंवार येणारे 'पृथ्वीचा सुरलोक' बनवण्याचे स्वप्न हे मुळात येशूच्या उपदेशातील आहे. ना. वा. टिळक आणि केशवसुत यांची घनिष्ट मैत्री होती. या मैत्रीतून टिळकांच्या ख्रिस्ती विचारांचा संस्कार केशवसुतांवर होऊन त्यांच्या काव्यात स्वर्गसमक्षतेची जाणीव प्रकट झाली असावी. मानवाने विशिष्ट प्रकारचे नैतिक आचरण केले की, पृथ्वीवर स्वर्गाचे राज्य येईल, असे ख्रिस्ती धर्म मानतो. स्वर्गाचे राज्य स्थापन होण्यासाठी आवश्यक असलेल्या नैतिक मूल्यांचा पुरस्कार आपल्या अनेक कवितांतून ना. वा. टिळकांनी केला. त्यामुळे त्यांच्या काव्यात स्वर्गाच्या राज्याचे संदर्भ अनेक ठिकाणी येतात. केशवसुतांच्या कवितेत स्वर्गसमक्षतेची कल्पना मानवाच्या दुःख-निर्मूलनाशी, जीवन केवलानंदमय बनविण्याशी आणि



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

सौंदर्यप्रस्थापनेशी जोडली गेलेली आहे. केशवसुतांच्या काव्यातील स्वर्गधरामिलनाची कल्पना जरी 'ख्रिस्ती' असली तरी त्यामागील जाणीव त्यांची स्वतःची आहे. केशवसुतांचे निकटवर्तीय वि. श्री. करंदीकर यांनी, केशवसुत 'बायबल' वाचीत असल्याचा उल्लेख केला आहे.[५६] ना. वा. टिळकांच्या संस्कारातून किंवा 'बायबल'च्या वाचनातून केशवसुतांच्या काव्यात स्वर्गसमक्षतेची कल्पना आलेली असू शकेल. या काळातील नवशिक्षित वर्गावर ख्रिस्ती मूल्यांचे कळतनकळत परिणाम कसे झाले हे दर्शविणारे केशवसुत हे एक ठळक उदाहरण आहे. थोडक्यात, जी जीवनमूल्ये नवशिक्षित वर्गाने प्रमाण मानली त्यांचा प्रत्यक्षाप्रत्यक्ष संबंध ख्रिस्तप्रणीत मूल्यव्यवस्थेशी होता. म्हणूनच टिळकांची ख्रिस्तीविचारांतून जन्मलेली लौकिक जीवनावरची कविता पाश्चात्त्य शिक्षण घेतलेल्या अ-ख्रिस्ती वाचकांना परकी वाटली नाही. त्यांना ती केशवसुतादी अन्य मराठी कवींच्या कवितेसारखीच वाटली. त्यामुळेच टिळकांच्या जाणिवांवर केशवसुतांचा प्रभाव असल्याचे बोलले जाते. परंतु परिस्थिती या उलट असण्याचा अधिक संभव आहे.

टिळकांची कविता अ-ख्रिस्ती वाचकास परकी वाटली नाही याचे आणखीही कारणे सांगता येतील. टिळकांच्या कवितेत भारतीय संस्कृतीतील मूल्ये आणि ख्रिस्ती मूल्ये यांचे संयुग झाले आहे. त्यांच्या कवितेतील पुष्कळशी प्रतिमासृष्टी ही भारतीय अध्यात्मातील संकल्पनांतून, रामायण-महाभारतातील घटना व व्यक्ती यांच्यातून आणि भारतीय संस्कृतीतील प्रमाणकांतून घडली आहे. तसेच त्यांच्या अनेक कवितांत ख्रिस्ती मूल्यविचार प्रत्यक्षपणे व्यक्त न होता तो व्यंजित झाला आहे. या सर्व कारणांमुळे तिचे 'ख्रिस्तीपण' आणि परकेपण वाचकांना जाणवत नाही. अर्थातच हे टिळकांनी जाणीवपूर्वक केले नाही. ख्रिस्ती मूल्ये आणि भारतीय सांस्कृतिक परंपरा यांच्या संयुगातून त्यांची निर्मितिक्षम संवेदनशीलता घडलेली असल्यामुळे त्यांच्या काव्य-निर्मितीत हे स्वाभाविकपणे घडले आहे.

या संदर्भात त्यांची 'केवढे हे क्रौर्य'[५७] ही अतिशय लोकप्रिय कविता उदाहरण म्हणून घेता येईल. एका शिकाऱ्याने गोड गाणाऱ्या एका पक्षिणीच्या केलेल्या हत्येचे चित्र या कवितेत टिळकांनी रेखाटले आहे. यातील पक्षिणीचे जीवन आणि ख्रिस्त-जीवन यांत टिळकांनी समांतरत्व प्रस्थापित केले आहे. यातील पक्षिणीचा मृत्यू येशूच्या बलिदानाची आठवण करून देतो. जे केवळ मानवाच्या सुखार्थ जगतात त्यांची नियती दुर्दैवाने येशूसारखीच असते; कारण अजूनही मानव बदलला नाही; त्याच्या ठिकाणी क्रौर्य, कृतघ्नता असे अवगुण अद्यापी कायम आहेत. (ते नष्ट झाले की स्वर्गाचे राज्य येणार आहे.) असे ही कविता सुचवते. येशूने ज्या प्रमाणे मानवाच्या कल्याणार्थ आपले आयुष्य वेचले त्याप्रमाणे कवितेतील पक्षिणीचेही वय 'नरजातीला रमविण्यात' निघून गेले आहे. आयुष्यभर ज्यांचे कल्याण येशूने चिंतिले त्यांनीच येशूला मृत्युदंड व्हावा म्हणून पायलटकडे आग्रह धरला. जिच्या मंजुळ स्वरांचा आनंद ज्यांनी घेतला, त्यांपैकी एकाने तिची हत्या केली. या कवितेत येशूचे जीवन आणि पक्षिणीचे जीवन यांत साम्य प्रस्थापित होत असल्यामुळे ती वाचताना वाचकाचे मन येशूच्या प्रतिमेकडे सहज जाऊ शकते. या कवितेतील पक्षिणीचा मृत्यूही येशूच्या खिळल्या जाण्याची स्मृती जागवणारा आहे. तिच्या मृत्यूबद्दल कवी म्हणतो -

मातीत ते पसरले अतिरम्य पंख,
केले वरी उदर पांडुर निष्कलंक!
चंचू तशीच उघडी, पद लांबवीले,
निष्प्राण देह पडला, श्रमही निमाले!

मृत्यूनंतरची तिची देहस्थिती येशूच्या क्रुसा-वरील देहस्थितीची आठवण करून देणारी आहे. तिचे (येशूच्या खिळलेल्या हातांसारखे) दोन्ही बाजूस पसरलेले पंख, जमिनीवर टेकलेली पाठ, वरच्या बाजूस असलेले तिचे उदर आणि तिने लांबावलेले पाय, यांतून क्रुसावर खिळलेली येशूची प्रतिमा वाचकाच्या मनात जागृत होते. येशूप्रमाणे आपल्यालाही कदाचित शेवटी सुळावर खिळावे लागणार, याची तयारी ठेवूनच येशूभक्ताने मानवाची सेवा केली पाहिजे, ही टिळकांची श्रद्धा या कवितेच्या पार्श्वभागी आहे. या कवितेतील पक्षिणी ही अशा प्रकारे मानव सेवेमध्ये आयुष्य घालवणाऱ्या येशूभक्ताची प्रतिमा आहे. 'करो जतन यापुढे प्रभु पिता अनाथा सदा' या तिच्या



मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

म्हणण्यातून आणि आपल्या पिलांना 'स्मरा मजबरोबरी परि दयाघना ईश्वरा' असे सांगण्यातून तिची येशूभक्ताची प्रतिमा सूचित होते. माणसाची कृतघ्नता आणि त्याचे क्रौर्य यांमुळे जीवनातील शिव, उदात्त गोष्टींच्या होणाऱ्या विनाशाचे केवळ चित्र ही कविता प्रस्तुत करीत असल्याचे सकृद्दर्शनी वाटते. अ-ख्रिस्ती सामान्य वाचकही ही कविता याच अर्थाने स्वीकारतो. परंतु ही कविता या पृष्ठभागावरील अर्थापलिकडे जाऊन जो 'ख्रिस्ती' अर्थ व्यंजित करते त्याकडे मात्र वाचकाचे लक्ष सहसा जात नाही. या कवितेप्रमाणेच त्यांच्या 'वृक्षान्योक्ती'[५८] ह्या कवितेत वृक्षप्रतिमेतून येशूचे जीवन व्यंजित झाले आहे. टिळकांची संवेदनशीलता पूर्णतः ख्रिस्तमय झालेली होती. हा ख्रिस्तही त्यांनी पाश्चात्त्यांकडून घेतलेला नसून तो त्यांनी स्वतः शोधलेला, त्यांना स्वतःला जाणवलेला ख्रिस्त होता. म्हणजेच तो भारतीय आध्यात्मिक परंपरेत घडलेल्या व्यक्तिमत्त्वाला जाणवलेला ख्रिस्त होता. थोडक्यात, त्यांच्या कवितेत त्यांना स्वतःला जाणवलेला येशू आणि ख्रिस्ती मूल्ये कमीअधिक प्रमाणात व्यंजित झालेली दिसतात.

टिळकांची कविता ही नैतिक जाणिवांच्या अभिव्यक्तीतून घडलेली असली तरी तिचे स्वरूप बोधवादी काव्यासारखे नाही. टिळकांसमोर निश्चित जीवनोद्दिष्ट आहे आणि ते साध्य करण्याचा निश्चित मार्गही आहे. समताधिष्ठित समाजाची जडणघडण करून भारताला एकात्म राष्ट्राचे स्वरूप देणे हे त्यांचे जीवितकार्य आहे. ख्रिस्ती जीवनमूल्यांच्या साह्याने हे साध्य होईल, अशी त्यांची श्रद्धा आहे. म्हणूनच ख्रिस्ती मूल्यांवरची त्यांची श्रद्धा आणि त्यांच्या हितकारकतेवरचा त्यांचा विश्वास, या दोन्ही गोष्टींची अभिव्यक्ती ते आपल्या कवितेतून साधतात. या साध्याच्या फलद्रुपतेसाठी ते जीवनातील प्रत्येक अंगाकडे नैतिक भूमिकेतून पाहतात आणि या अंगांचा नैतिक अर्थ लावू पाहतात. जेथे त्यांना इष्ट मूल्यांचा आढळ होतो तेथे त्याबद्दल ते आनंद, समाधान प्रकट करतात आणि जेथे त्यांना त्यांच्या जीवनोद्दिष्टाच्या संदर्भात प्रतिकूल गोष्टी दिसतात तेथे ते दुःखाची भावना प्रकट करतात. दुःखाची ही भावना अनेकदा तीव्र उपहासातून किंवा परखड निषेधातून प्रकट होते. हे स्त्रीपुरुषांच्या प्रेमाकडेच नव्हे तर निसर्गाकडेही याच नैतिक आणि नीतिसंलग्न भावनेने पहातात. 'माझी भार्या'[५९] या कवितेतील पुढील ओळी याची साक्ष देतील:

तिच्या त्या प्रीतीने मजपुढति शुद्धत्व विलसे,
तिच्या त्या प्रीतीने कृपणपण सारेच निरसे;
तिच्या त्या प्रीतीने विलय बघतो स्वार्थ अवघा,
तिच्या त्या प्रीतीने मम सकल हो वृत्ति अनघा
तिच्या त्या प्रीतीने शुभमय जगीं स्त्रीत्व दिसते,
दिसे ते स्वर्गीचे धरणिवरचे दिव्य नुसते !

त्यांची 'कुणास्तव कुणी तरी'[६०] ही कविताही या प्रकारचीच आहे. 'रानात एकटेच पडलेले फूल'[६१] या निसर्गाचे चित्र असलेल्या कवितेतील फूल 'दिसण्यात। फार ते साधे। परी आमोदे जगामधि पहिले।।' असे आहे. येथे फुलाच्या नैतिक गुणांचे वर्णन टिळकांनी केले आहे. टिळकांची संवेदनशीलतेच्या जडणघडणीत येशूवरील श्रद्धा आणि नैतिक मूल्ये यांचा फार मोठा वाटा असल्याने ते जीवनाच्या सर्वच अंगांकडे नैतिक दृष्टीने पाहतात.

ना. वा. टिळकांच्या कवितेत एकतर ख्रिस्ती मूल्यविचार प्रकट होतो किंवा ख्रिस्ती मूल्यांशी संयुक्त झालेला, ख्रिस्ती मूल्यांमुळे नवा अर्थ प्राप्त झालेला भारतीय सांस्कृतिक परंपरेतला मूल्यविचार किंवा भारतीय सांस्कृतिक परंपरेमुळे वेगळा अर्थ प्राप्त झालेला ख्रिस्ती मूल्यविचार प्रकट होतो. त्यांच्या या दोन प्रकारच्या काव्यांपैकी आपण प्रथम ख्रिस्ती मूल्यविचार प्रकट करणाऱ्या काव्याचा विचार करू. ही मूल्ये मानवी जीवनात सुख, शांती आणि समृद्धी आणणारी, म्हणजेच मानवी जीवनाला 'स्वर्ग' बनवणारी असून ती भारताच्या विकासासाठी आणि भारताला राष्ट्र बनविण्यासाठी आवश्यक आहेत, अशी श्रद्धा ख्रिस्ती मूल्यविचार प्रकट करणाऱ्या कवितेतून व्यक्त होते. त्यामुळेच मूल्ये भारतीय संस्कृतीत रुजावीत अशी अपेक्षा ही कविता सूचित करते.

देवाच्या किंवा स्वर्गाच्या राज्यासंबंधीच्या बायबलप्रणीत संकल्पनेला टिळकांनी 'स्वाराज्य' ही संज्ञा वापरली आहे. हे स्वाराज्य प्रस्थापित होण्यासाठी माणसांचे अंतःकरण बदलले पाहिजे. ते येशूविचारांमुळेच बदलेल, हीसुद्धा टिळकांची श्रद्धा आहे. टिळकांच्या दृष्टीने माणूस



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

हा चांगले-वाईटाचे मिश्रण आहे. माणसाचे हे संमिश्र रूप टिळकांनी भारतीय माणूस समोर ठेवून रंगवले आहे. ते 'शुभाशुभाचा संगम हा'[६२] या कवितेत म्हणतात :

विचार ज्याचे उच्च अति। तयाचीच अति नीच कृति...
ईश्वरचिंतन। करी चिरंतन। परंतु अंत न
द्वेषी जगताला याला। स्वार्थाला केवळ विकला! ...
एक असे तों एक नसे। मनुष्यपण हें असें असे!
शुभाशुभाचा संगम हा!। मोहाचा आवर्त महा!
अशा नराला। तारायला। एकच झाला
जगामधे अवघ्या त्राता। दिव्यशुद्ध जीवनदाता।

टिळकांनी वर्णिलेला हा माणूस चिरंतन ईश्वरचिंतन जरी करीत असला तरी तो या जगताचा द्वेष करणारा आहे. ह्या माणसाचे तारण करणे आवश्यक आहे आणि ते येशूमुळेच होणार आहे; हा येशू 'दिव्यशुद्ध जीवनदाता' असल्यामुळे तो जगताचा द्वेष करणाऱ्या माणसाला दिव्य आणि शुद्ध जीवन देणारा आहे; असे टिळक येथे सुचवीत आहेत. जीवनापासून विरक्ती घेण्याला महत्त्व देणारा भारतीय माणूस जगाचा द्वेष करीत असल्यामुळे जगावर प्रेम करण्याचा संदेश देणाऱ्या येशूची त्याला आवश्यकता आहे; असेही त्यांना म्हणायचे आहे. दिव्य आणि शुद्ध जीवन जेव्हा मानवाला लाभेल तेव्हा या पृथ्वीवर स्वर्ग निर्माण होईल. असा स्वर्ग निर्माण व्हावा म्हणून प्रयत्नशील असणे, हे आपले जीवनभराचे कार्य आहे; असे टिळकांना वाटत होते. टिळकांची जीवनोद्दिष्टे आणि त्यांच्या प्राप्तीचे मार्ग स्पष्ट आणि निश्चित असल्याचे यापूर्वी जे म्हटले ते याच अर्थाने.

या जगतात 'स्वाराज्य' स्थापन करायचे असेल तर भिन्न भिन्न व्यक्तिमत्त्वे असलेल्या माणसाची मने जुळली पाहिजेत; त्यांच्यात बंधुभाव निर्माण झाला पाहिजे. भारतावर राज्य करताना भारतीयांना नवशिक्षण देऊन आणि त्यांना आधुनिक बनवून भारताची विषमतामूलक समाजरचना बदलवून टाकण्याचे आणि माणसामाणसांत बंधुभाव वाढविण्याचे कार्य ब्रिटानिया करीत आहे; असे टिळकांना वाटते. म्हणून 'ब्रिटानिया'[६३] या कवितेत ते म्हणतात :

अंतःकरणे भिन्न भिन्न ही हळूहळू तू जुळिशी,
कालेकरुनी होइल यांचा परम मनोहर राशी.
हा राशी, हा समुच्चय, मनःसंमेलन, हे ऐक्य
करील या जगताचा अमुच्या दुसरा स्वर्ग सुरेख,
या विश्वाचे रचिणारे मग अंतःकरण रमेल
या स्वर्गी नव, सुखशांतीचे निधान हेच गमेल!

ही कविता ब्रिटिशधार्जिणेपणातून लिहिली गेली नाही. टिळकांनाही स्वराज्य हवे होते पण या संबंधी त्यांची भूमिका नेमस्तपणाकडे झुकणारी होती. भारताला आवश्यक असणारी ख्रिस्ती मूल्ये प्रस्थापित होण्याच्या दृष्टीने इंग्रजी सत्तेचा कसा उपयोग झाला, एवढेच त्यांना येथे सांगायचे आहे. इंग्रजी राज्यामुळे या समाजातील जातिमूलक विषमता नष्ट होण्यास प्रारंभ झाला आहे; हे येशूस्वीकाराच्या पथावर पुढे पडलेले एक पाऊल आहे; त्यामुळेच 'सुखशांतीचे निधान' असलेला स्वर्ग येथे आणण्याच्या कार्यात प्रगती झाली आहे, असे त्यांना वाटते.

हिंदुधर्माकडून ख्रिस्ती धर्माकडून झालेला आपला प्रवास त्यांनी दोन कवितांमध्ये चित्रित केला आहे. ह्या दोन्ही कविता भारताला ख्रिस्ती मूल्यांची आवश्यकता असल्याचे आणि भारताने ती स्वीकारावीत, हे सूचित करीत आहेत. त्यांपैकी एक कविता 'माझे दशावतार'[६४] ही आहे. गर्भावस्थेपासून वृद्धपणापर्यंतच्या सर्व अवस्था हे आपल्या आयुष्याचे 'दशवतार' आहेत; आणि अंतिमतः ख्रिस्तचरणीच आपले हे अवतार संपणार आहेत; असे टिळक या कवितेत म्हणत आहेत. गर्भावस्थेत असताना आपण मत्स्य, कच्छ, वराह हे अवतार धारण केले. या तिन्ही अवतारांत प्रभूनेच आपले रक्षण केले. आईचे गर्भाशय फाडून आपले जगात प्रवेश करणे म्हणजे आपला 'नृसिंहावतार'. आपले बालरूप म्हणजे आपला वामनावतार; हातात अभिमानाचा परशू धारण केलेले तारुण्य हा आपला परशुरामवतार; आपले संसारात, मुलाबाळांत रमणे हा कृष्णवतार; आपल्याला धर्मनीती सुचू लागली आणि आपण रामावतारी झालो; म्हातारपणी आलेले शहाणपण हा आपला बौद्धावतार. असे जीवन जगत असताना आपल्याला 'परेशाची' आठवण झाली नाही. शेवटी आपण 'कल्की', म्हणजे पापी, असल्याची जाणीव झाली आणि आपल्याला 'पतितपावना' चे स्मरण झाले.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मग आपण तारणकर्त्याला शरण गेलो. असे आपल्या आयुष्याचे 'दशावतार' टिळक या कवितेत सांगत आहेत. 'दशावतार' या शब्दाला आयुष्यात वेगवेगळ्या प्रकारची संकटे आणि असह्य दुःखे भोगत राहावे लागणे, असाही अर्थ आहे. तोही टिळकांना येथे अभिप्रेत आहे. आपले ख्रिस्तस्वीकृतिपूर्व जीवन म्हणजे आपण मुळात 'कल्की' आहोत, याची जाणीव होण्याच्या दिशेने घडलेला प्रवास. स्वतःच्या कल्कीपणाची जाणीव झाल्यावर पापमुक्तीसाठी आपण तारणकर्त्यास शरण गेल्याचे आणि ख्रिस्तस्वीकार हा आपला अंतिम अवतार असल्याचे ते येथे सूचवीत आहेत. दशावतार मानणाऱ्या भारताचाही प्रवास येशू-स्वीकाराने पूर्ण व्हावा, ही अपेक्षाही या कवितेत सूचित झाली आहे. ख्रिस्ती धर्म हा हिंदू धर्माची विकसित, आणि परिपूर्ण अवस्था आहे; ही त्यांची श्रद्धा या कवितेच्या निर्मितीमागे असल्याचे दिसून येते.

'अहो कसे काय?'[५५] ही या प्रकारची त्यांची दुसरी कविता. येथे कवी 'अहो कसे काय?' या शब्दांची आठवण येईल अशा स्वरांत ओरडणाऱ्या पक्ष्यास उद्देशून बोलत आहे. हा पक्षी आपल्या ओरडण्यातून ज्याला त्याला हाच प्रश्न विचारीत आहे. त्यातून तो, तुम्ही ज्या प्रकारचे जीवन जगता ते योग्य नाही, असेच सुचवीत आहे, असे टिळकांना वाटते. हाच प्रश्न त्याने आपल्यालाही विचारला असून आपण त्याला उत्तर देत आहोत, अशा भूमिकेतून या कवितेचे लेखन झाले आहे. संपत्तीने आपल्या घरास माहेर मानले आणि आपण सुखात लोळत राहिलो, असे कवी त्याला सांगतो. यावर तो पक्षी कवीला विचारतो 'कसे काय?' कारण त्याला कवीचे असले जीवन मंजूर नाही. कवी आपल्या जीवनाची एकेक अवस्था सांगत जातो आणि प्रत्येक वेळी तो पक्षी त्याला हाच प्रश्न विचारून आपली नापसंती दर्शवीत राहतो. यावर कवी म्हणतो -

व्यर्थ पसारा सोडुन सारा संन्यासी जाहलो
माझें कोणि न, मी न कुणाचा ब्रह्मरसी रंगलो

या पक्ष्याला हे 'ब्रह्मरसी रंगण्या' विषयीचे उत्तरही असमाधानकारक वाटते. येथे टिळक हिंदू परंपरेतील मोक्षासाठी घेण्यात येणारा वैराग्यपूर्ण संन्यास नाकारीत आहेत. त्यांची अनुरागयुक्त संन्यासाविषयीची कल्पना आपण यापूर्वी सविस्तर पाहिली आहे. मग कवी आणखी एक उत्तर देतो. तो म्हणतो -

प्रभूची प्रीती, प्रीति नराची, राज्य प्रीतिचे दिसे
मीपण कोठे माझे नकळे! ठावे प्रभूला असे

हे उत्तर ऐकताच त्या पक्षाचे ओरडणे बदलते. आता तो पक्षी 'फार बरे रे! फार बरे रे! फार बरे!' असे शब्द ज्यांतून ऐकू येतील अशा स्वरांत ओरडतो आणि त्यातून या उत्तराने आपले समाधान झाल्याचे सूचित करतो. या कवितेतही त्यांनी माणसाच्या जीवनोद्दिष्टांबद्दल ख्रिस्ती मूल्यकल्पना मांडली आहे. वैयक्तिक मोक्षाच्या उद्दिष्टाप्रमाणेच सर्वप्रकारची वैयक्तिक सुखोपभोग देणारी उद्दिष्टे आणि भौतिक जीवनाचा येणारा उबग त्यांनी नाकारला आहे. माणसाला धन, सत्ता आणि ज्ञान यांचा हव्यास तरी वाटतो किंवा त्याला भौतिक जीवनाचा, संसाराचा उबग तरी येतो. असा उबग आला, की त्याला वैराग्य आणि मोक्षप्राप्त्यर्थ घेतलेला संन्यास या गोष्टी मूल्यवान वाटू लागतात. या सर्व गोष्टींना हिंदूपरंपरेत स्थानही आहे. टिळकांना मात्र मानवप्रेम आणि त्यासाठी केला जाणारा आत्मविलय या गोष्टी सर्वांत मूल्यवान वाटतात. वैयक्तिक सुखोपभोगांकडून, तसेच हिंदू परं तील भौतिक जीवनाबद्दलच्या उबगेकडून आणि वैराग्याकडून भौतिकजीवनावर आणि मानवावर प्रेम करण्याचे शिकवणाऱ्या ख्रिस्तविचाराकडे आपला झालेला प्रवास टिळकांनी येथे सूचित केला आहे. हा एका परीने अपूर्णतेकडून पूर्णतेकडे झालेला प्रवासच आहे.

टिळकांच्या ख्रिस्ती धर्मविचारांच्या परिपूर्णतेवरील श्रद्धेतून आणि त्यांच्या काव्यनिर्मिती मागील उद्दिष्टांतून त्यांची कवीसंबंधीची आणि काव्याच्या स्वरूपासंबंधीची भूमिका निश्चित झाली आहे. कवी आणि त्याची कविता यासंबंधी टिळकांची भूमिका पाहताना आपणास तुकारामांच्या यासंबंधीच्या भूमिकेची आठवण होते. टिळकांच्या आणि तुकारामांच्या कवी व काव्य या विषयींच्या संकल्पनांमध्ये जरी खूपसे साम्य असले तरी दोघांच्या धर्मविषयक भूमिका भिन्न असल्यामुळे या भूमिकांत मूलभूत स्वरूपाचे अंतरही आहे. स्वतःच्या काव्यवाणीबद्दल तुकाराम म्हणतात : 'आपुलिया बळे नाहीं


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

मी बोलत। सखा भगवंत वाचा त्याची।। ....काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें। परि त्या विश्वंभरें बोलविलें।।"[६६] तुकारामांच्याच स्वरात ना. वा. टिळक म्हणतात :

जे जे मी गातो ते नाही माझे परंतु देवाचे
कविता दूती त्याची बोलवि मज पाहिजे तसे वाचे ....
सहर्ष जेव्हा पाहे ती देवदूतिका याला
तत्काल काम सोडुन वेडा हा लागतोच गायाला"[६७]

तुकारामांच्या तोंडून 'सखा भगवंत' स्वतःच बोलतो. याचे कारण तुकारामांचा आत्मा आणि परमात्मा एकत्व पावले आहेत. त्यांच्या ह्या काव्यविषयक भूमिकेमागे अद्वैती विचार आहे. टिळकांमधील कवीच्या तोंडून खुद्द परमेश्वर बोलत नाही. ख्रिस्ती धर्मानुसार परमेश्वर आपला संदेश संदेष्ट्यामार्फत किंवा देवपुत्रामार्फत मानवाकडे पाठवतो. देवाने आपल्यामार्फत पाठवलेला संदेश सर्वत्र पोचविण्याच्या कार्यासाठी, देवपुत्र असलेल्या येशूने जे बारा शिष्य निवडले होते त्यांच्या तोंडून मात्र, एका प्रसंगी परमेश्वर बोलणार असतो. आपल्या बारा शिष्यांना सर्व अधिकार देताना येशू म्हणाला होता की, तुम्हांला जेव्हा न्यायसभेसमोर उभे करण्यात येईल तेव्हा तेथे काय बोलायचे याची काळजी करू नका. 'कारण बोलणारे तुम्ही नाही, तुमच्या आकाशातील पित्याचा आत्मा हाच तुमच्याद्वारे बोलणारा आहे."[६८] परंतु हे फक्त बारा शिष्यांनाच विशिष्ट प्रसंगापुरतेच लागू होते. म्हणूनच कवी टिळक जरी देवाला अभिप्रेत असलेले गाणे गात असले तरी प्रत्यक्ष देव नव्हे तर देवाची दूती असलेली कविता ते त्यांच्या तोंडून गाववून घेते. देवाला जे हवे आहे ते देवदूत कवीकडून वदवून घेतात, ही कल्पना टिळकांनी आणखी एका कवितेत मांडली आहे. ते म्हणतात :

वर देवदूत बसले कविहृदयाच्या धरून कीलातें
नाचविती करवीती कविवाणीच्याकडून लीलांतें
याचा गर्व कशाला? बोलविता तो धनी निराळा हो!
कविच्या द्वारा रसिकां काव्यरसाचा करून दे लाहो"[६९]

तेथे तुकारामांचे 'बोलविता धनी' हे शब्द टिळकांच्या या कवितेतही वापरले गेले आहेत. परंतु येथे बोलविता धनी असलेला परमेश्वर देवदूतांमार्फत कविहृदयाच्या खुंट्या फिरवून, कवीच्या तोंडून रसिकांना काव्यरसाचा लाभ मिळवून देत आहे. टिळकांच्या दृष्टीने कवीचा दर्जा येशूच्या बारा शिष्यांसारखा नसून तो येशूचा संदेश सामान्यांपर्यंत पोचविणाऱ्या येशूच्या अनन्य भक्तासारखा आहे. परमेश्वराला जे हवे आहे ते तो कवीकडून त्याच्या काव्याद्वारे वदवीत असतो; हे टिळकांनी 'कवीची विनवणी'[७०] या कवितेतही सुचवले आहे. टिळक येथे म्हणतात की, माझ्या हृदयात खुशाल भाला घाला परंतु माझ्या कवितेला मात्र जराही स्पर्श करू नका. 'कारण, कवने नच माझी, । नच तुमची, - मी गातो जी। ही निःश्वसिते। कोण सोडिते। मम हृदयी, ते -। विचारुनी, भिऊनी त्याला। पुढे करा मग कर अपुला।' येथे टिळक टीकाकारांना उद्देशून बोलत आहेत. माझ्या हृदयात परमेश्वराने सोडलेल्या निःश्वासांतून हे काव्य जन्मले असून त्या परमेश्वराची भीती बाळगूनच मग माझ्या काव्याला स्पर्श करा, असे टिळक म्हणत आहेत. ते पुढे म्हणतात : 'वंदा, निंदा! परि दुरुनी! पवित्र ही कवितारमणी।' परमेश्वराच्या संदेशाशी काव्याचा संबंध असल्यामुळे कवितारमणी 'पवित्र' आहे. म्हणून तिचे पावित्र्य भंगणार नाही असेच तिला वंदा अगर निंदा, असे टिळक टीकाकारांना विनवीत आहेत. यातून 'परमेश्वराचा संदेश आपल्या काव्यातून रसिकापर्यंत पोचविणारा येशूभक्त' अशी कवीची प्रतिमा टिळकांनी घडवली आहे. मराठीतील तुकारामादी संतकवींच्या प्रतिमेशी ती मिळतीजुळतीच आहे. 'येशूभक्त कवी' अशी आपली प्रतिमा घडवणाऱ्या टिळकांनी भक्तिपर अभंग लिहिले हेही सुसंगत आहे. कवीचे असेच चित्र त्यांनी 'वनवासी फूल' या दीर्घ काव्यातही रेखाटले आहे. त्याचा विचार आपण नंतर करणार आहोत.

असा येशूभक्त कवी आपल्या कवितेत येशूच्या अस्तित्वाचीच अपेक्षा करणार. तिने येशूविचार सदैव प्रकट करावा अशीच इच्छा बाळगणार. 'कविते मला ख्रिस्तजयंतीनिमित्त कोणती भेट देतेस?'[७१] या कवितेत त्यांनी हीच इच्छा प्रकट केली आहे. ते म्हणतात :

अशनी शयनी जनी वनी
प्रभु बाहेर तसा दिसो मनी
मज हो प्रभु-छंद लागला



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

असले दे नव चित्र मला
प्रभुची प्रतिमा सुनिर्मळा
रुचिरोपायन हेच दे मला
नलगे मज सांगतो तुला
जरि राशी मणिंचा मला दिला

'कवीचें उद्यान'[७२] या कवितेत टिळकांनी याच प्रकारची आपली काव्यविषयक कल्पना मांडली आहे. या कवितेत त्यांनी काव्यक्षेत्रासाठी 'उद्यान' आणि कवीसाठी या उद्यानाचा 'निर्माता' या प्रतिमांची योजना केली आहे. टिळकांच्या ह्या काव्यविषयक कवितेत हिंदू पुराणातील नंदनवन, कल्पतरू आणि विद्या व कला यांची देवता असलेली शारदा यांचे व काही ख्रिस्ती मूल्ये यांचे संयुग घडवले आहे. टिळकांची शारदा ही केवळ हिंदू देवता नाही. ती कुठल्याही एका धर्माशी संबंधित नसलेल्या, किंबहुना ज्याचा प्रत्येक धर्माशी संबंध आहे अशा काव्याची ती देवता आहे. येथे त्यांनी हिंदूदेवता असलेल्या शारदेचे रूपांतर धर्मातील देवतेत केले आहे. ती हिंदू धर्मातील नव्हे तर भारतीय संस्कृतीतील काव्यदेवता आहे. अर्थातच ही सांस्कृतिक देवता हिंदू पुराणकल्पित नंदनवनाची रहिवाशी नाही. टिळक म्हणतात की हिंदूपुराणसंबंधित नंदनवन हे ब्रह्मा, विष्णू, महेश यांचे ठिकाण असेल कदाचित; परंतु काव्यदेवता असलेल्या शारदेचे निवासस्थान मात्र कविनिर्मित काव्योद्यान आहे. तेथे ती वीणावादन करीत बसली आहे. अर्थात हे काव्योद्यान कुठल्याही एका धर्माचे असणार नाही. ते सर्व धर्मांच्या कवींचे आणि रसिकांचे आहे. टिळक म्हणतात की, कविनिर्मित काव्योद्यान हे 'मधु गंधाचे। मधुर रसाचें,। सुंदरतेचे। .... सुखशांतीचें प्रेमाचें!' उद्यान असून ते नंदनवनापेक्षाही सुंदर आहे. येथे ते काव्याचे आशयक्षेत्र स्पष्ट करीत आहेत. कविनिर्मित उद्यान केवळ सुंदर गोष्टींनी भरलेले नाही तर तेथे सुखशांती आणि प्रेम या नैतिक गोष्टीही आहेत. त्यांची या कवितेतील भूमिका त्यांच्या नैतिक प्रेरणेशी सुसंगतच आहे. सौंदर्यप्रतीती आणि नैतिक आशयाची अभिव्यक्ती या दोन काव्योद्दिष्टांसाठी त्यांनी या कवितेत 'भावतरू' आणि 'अनुरागतरू' अशा दोन अद्भुत तरूंची योजना केली आहे. ते म्हणतात की, पुराणवर्णित नंदनवनात इच्छुकाला हवे ते देणारा कल्पतरू आहे असे सांगितले जाते. परंतु कविनिर्मित उद्यानात त्यापेक्षाही श्रेष्ठ असा भावतरू आहे. इच्छुकाला हवे असलेले मागण्यापूर्वी कल्पतरूची पूजा करावी लागते. परंतु या काव्योद्यानात येणाऱ्या रसिकाला या उद्यानातील ह्या भावतरूची पूजा करावी लागत नाही. तो रसिकास, ज्या गोष्टी त्याला प्रत्यक्ष सृष्टीत प्राप्त होत नाहीत त्या आपणहून देतो. मधुर अशा रस-गंधादी संवेदना आणि भावसौंदर्य यांची प्राप्ती या 'भावतरू' कडून रसिकांस आपोआपच होते, असे टिळक येथे सुचवीत आहेत. त्याशिवाय या उद्यानात 'अनुरागतरू' ही आहे. त्याच्या फळाचे माधुर्य असे की, ज्यापुढे अमृतही चोथ्यासारखे वाटावे आणि त्याची छाया ही शमदमांची जननी असून संसारतापावरची ती मधुर मात्राच आहे, असे टिळक या कवितेत म्हणतात. हिंदू पुराणे आणि ख्रिस्ती मूल्ये यांचे संयुग घडवून टिळकांनी येथे 'भावतरू' आणि 'अनुरागतरू' अशी दोन नवी मिथके घडवली आहेत.

येथे टिळक हिंदूपरंपरेतील नंदनवनकल्पनेचे रूप काही प्रमाणात पालटून त्यातून त्याच्याशी समांतर असे आपले काव्योद्यान उभे करतात. या कवितेत टिळक हिंदूपुराणातील कल्पतरूशी 'भावतरू' आणि 'अनुरागतरू' यांची सांगड घालतात. नंदनवनातील कल्पतरूत जे सामर्थ्य आहे तसेच, पण त्यापेक्षाही अधिक सामर्थ्य काव्योद्यानातील भावतरू आणि अनुरागतरू यांच्यात आहे. येशूने सांगितलेल्या, मानवाने मानवावर आणि मानवी जीवनावर करावयाच्या प्रेमासाठी त्यांनी अनुरागतरूचे मिथक निर्मिले आहे. येशूने केवळ शेजाऱ्यावरच नव्हे तर 'शत्रूवरही प्रेम करा' असा संदेश दिला होता. मानवावर करावयाच्या निष्काम प्रेमासाठी टिळक इतरत्रही 'अनुराग' हा शब्द योजतात. काव्य हे मानवासाठी निर्माण झालेले असते आणि ते मानवाचे सुख आणि कल्याणच इच्छिते. काव्योद्यानातील भावतरू माणसाला सौंदर्यानंदाची प्राप्ती करून देतो आणि अनुरागतरू त्याचे कल्याण करतो. हा तरू माणसाच्या वासनांचे शमन-दमन होईल अशी छाया त्याला देतो आणि संसारात त्याला भोगाव्या लागणाऱ्या तापावर मधुर आणि गुणकारी औषधही देतो. येशूची वचने ही या तरूची मधुर फळे असून त्यांच्यापुढे अमृतही चोथ्यासारखे बेचव ठरणार







राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

आहे. शारदेचे निवासस्थान असलेल्या काव्योद्यानात टिळकांनी येशूचा अनुरागतरू रुजवून भारतीय संस्कृतीतील मिथकांचे आणि ख्रिस्ती मूल्यांचे संयुग घडवून आणले आहे.[७३]

(क्रमशः)

✠✠✠

## संदर्भ ग्रंथांची यादी

**३६.** म. म. डॉ. पां. वा. काणेकृत धर्मशास्त्राचा इतिहास : सारांशरूप ग्रंथ पूर्वार्ध, अनुवादक य. आ. भट, महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई, दु. आ. १९८०, पृ. ३३०. **३७.** पहा : 'मनुस्मृति', संपा. स्वामी वरदानंद भारती, प्रकाशक–श्री राधा दामोदर प्रतिष्ठान, पुणे, २००१, अध्याय सहावा, लोक ३८ ते ९७, तसेच भारतीय संन्यासकल्पनेच्या एकूण स्वरूपाबद्दल पहा : 'डॉ. म. म. पां. वा. काणेकृत धर्मशास्त्राचा इतिहास : सारांशरूप ग्रंथ, पूर्वार्ध', अनु. य. या. भट, म. रा. साहित्य संस्कृती मंडळ, मुंबई, दु. आ. १९८०. 'संन्यास' हे प्रकरण. **३८.** जे. सी. विन्स्लो : नारायण वामन टिळक, पृ. ११८ ते १२०. **३९.** स्मृतिचित्रे, पृ. ४५५. **४०.** स्मृतिचित्रे, पृ. ४६७. **४१.** त्यांच्या अभंगांतही हे सर्व आलेले आहे. **४२.** स्मृतिचित्रे, पृ. ४६८, ५०२, ४८०,४६१, ४८३, आणि ५०८. **४३.** स्मृतिचित्रे, पृ. ४६८–४७०. **४४.** स्मृतिचित्रे. ४५९. **४५.** स्मृतिचित्रे, पृ. ७६४. **४६.** विवाहविधीच्या तपशिलासाठी पहा, स्मृतिचित्रे, पृ. ७५३ ते ७६४. **४७.** स्मृतिचित्रे, पृ. ५१३–५१५. **४८.** स्मृतिचित्रे, पृ. ५२५ तळटीप. **४९.** स्मृतिचित्रे, पृ. ७०२. **५०.** स्मृतिचित्रे, पृ. ७१०. **५१.** स्मृतिचित्रे, पृ. ७०६. **५२.** स्मृतिचित्रे, पृ. ७०४. **५३.** स्मृतिचित्रे, पृ. ७०४.

**३.**

**५४.** 'टिळकांची कविता भाग–४था, 'प्रस्तावना', पृ. ११. **५५.** वनवासी फूल, 'ना. वा. टिळक : व्यक्तिदर्शन व काव्यविवेचन', पृ.१२. **५६.** पहा : संपा. भ. श्री. पंडित, 'समग्र केशवसुत', व्हीनस प्रकाशन, पुणे, पुनर्मुद्रण १९७८, 'केशवसुतांचे चरित्र', पृ. ३५. **५७.** टिळकांची कविता – भाग १, पृ. १०४. **५८.** टिळकांची कविता, भाग १ ला, पृ. १५०. **५९.** टिळकांची कविता, भाग १ ला, पृ. ७२. **६०.** टिळकांची कविता, भाग १ ला, पृ. ८३. **६१.** टिळकांची कविता, भाग १ ला, पृ. ८६. **६२.** टिळकांची कविता, भाग १ ला, पृ. १३६.. **६३.** टिळकांची कविता, भाग १ ला, 'वैचित्र्य आणि ऐक्य' – 'ब्रिटानिया' या काव्याचा एक भाग, पृ. १३६. **६४.** टिळकांची कविता– भाग ४ था, पृ. २४४. **६५.** टिळकांची कविता– भाग ४ था, पृ. ४१. **६६.** पहाः तुकारामांची गाथा, सरकारी प्रत, अभंग कं. २९५०. **६७.** टिळकांची कविता – भाग ४ था, 'ही कविता कोणी केली' पृ. ३२. **६८.** मत्तय १०-१९.व २०. **६९.** 'टिळकांची कविता', भाग १ ला, 'कवि' पृ. २२. **७०.** टिळकांची कविता — भाग १ ला, पृ. २१. **७१.** टिळकांची कविता–भाग ४ था, पृ. २७. **७२.** टिळकांची कविता, भाग १ ला, पृ. २४. **७३.** 'कवीचे उद्यान' या कवितेच्या लेखनाचा दिनांक दिला गेला नाही. असे असले तरी टिळकांनी ख्रिस्ती धर्म स्वीकारल्यानंतर ही कविता लिहिली, हे तिच्यातील आशयावरून स्पष्ट आहे. तिच्या प्रारंभी तिची चाल नमूद करताना केशवसुतांच्या 'हरपले श्रेय' या कवितेतील 'त्रिखंड हिंडुनि धुंडितसे' या पहिल्या चरणाच्या खंडाचा उल्लेख केला आहे. केशवसुतांची ही कविता त्यांनी १९०५ साली लिहिली असयाची नोंद आहे. टिळकांनी १८९५ साली ख्रिस्ती धर्म स्वीकारला.

✠✠✠

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# श्रीकृष्णाने वसुदेवास सांगितलेला भारतीय युद्धाचा वृत्तांत

म० अ० मेहेंदळे

भारतीय युद्ध संपल्यावर कृष्ण द्वारकेस परत गेला तेव्हा वसुदेवाने त्याला भारतीय युद्धाचा वृत्तांत सांगण्यास सांगितले. वसुदेव म्हणाला, की त्याने पुष्कळांकडून युद्धाविषयी ऐकले आहे, परंतु कृष्ण हा युद्ध प्रत्यक्ष पाहणारा, तेव्हा त्याच्याकडून युद्धाची खरीखुरी माहिती (यथातथ्येन १४.५९.२) त्याला हवी होती. वडिलांच्या विनंतीनुसार कृष्णाने वडिलांना थोडक्यात वृत्तांत सांगितला.

कृष्णाने सांगितलेला वृत्तांत थोडक्यात (समासेनैव) म्हणजे फारच थोडक्यात आहे (१४.५९.७). अगदी त्रोटक स्वरूपाचा वृत्तांत असेच त्याचे वर्णन करावे लागेल: तरीही त्याच्या वृत्तांतात आणि पूर्वी संजयाने धृतराष्ट्राजवळ केलेल्या वर्णनात काही ठळक फरक जाणवतात. कृष्णासारखाच संजय देखील युद्धाचा 'प्रत्यक्षदर्शी'. संजय आणि कृष्ण दोघेही रणांगणावर प्रत्यक्ष हजर असले तरी रणभूमीवर सर्वत्र चाललेले युद्ध त्यांनी पाहिले असणे शक्य नाही. काही युद्ध त्यांनी प्रत्यक्ष पाहिलेले असणार, काही माहिती ऐकीव असणार. त्यामुळे त्यांच्या वर्णनात तपशीलाच्या बाबतीत थोडा फरक आढळला तर तो समजण्यासारखा आहे परंतु जो फरक आढळतो तो तसा नाही, महत्त्वाच्या बाबतीत आहे. त्यामुळे दोघांच्या वर्णनातले फरक लक्षात घेणे इष्ट आहे.

(१) पहिला फार मोठा फरक जाणवतो तो पांडवांच्याकडील सेनापतिपदाविषयीचा. संजयाने दिलेल्या माहितीत पांडवांकडील पहिला सेनापती धृष्टद्युम्न. त्यात नंतर केव्हाही बदल झाल्याचा उल्लेख नाही. मात्र कौरवांकडले सेनापती, ते एका मागोमाग एक पडल्याने, बदलावे लागले, आणि अठरा दिवसांच्या युद्धात अनुक्रमे भीष्म, द्रोण, कर्ण, शल्य आणि अखेर अश्वत्थामा (९.६४.३६-४०) असे कौरवांचे पाच सेनापती झाले. पांडवांचा पहिला सेनापती धृष्टद्युम्न अखेरपर्यंत चालू राहिला.[१]

परंतु कृष्णाने वसुदेवाला दिलेल्या माहितीप्रमाणे कौरवांच्या सेनापति-बदलाबरोबरच पांडवांचेही सेनापती बदलत गेले आणि क्रमाने शिखण्डी, धृष्टद्युम्न, अर्जुन आणि युधिष्ठिर असे चार सेनापति झाले (१४.५९.९, १५, २०, २३). म्हणजे धृष्टद्युम्नाकडे पांडवांचे सेनापतिपद पाचच दिवस (युद्धाचे ११ ते १५ हे दिवस) राहिले. कृष्णाची ही माहिती विश्वासार्ह वाटत नाही. त्याची माहिती खरी मानायची तर पांडवांनी जणू कौरवांच्या प्रत्येक सेनापतीचा मृत्यू कोणाच्या हातून होणार हे आधीच ओळखून त्याप्रमाणे आपले सेनापती बदलले.

(२) दुसरा फरक जाणवतो तो द्रोणवधा-संबंधीचा, कृष्ण सांगतो: "ततो द्रोणः परिश्रान्तो धृष्टद्युम्नवशं गतः" (१४.५९.१८). त्याचा अर्थ असा, की युद्ध करता करता द्रोण दमला आणि त्यामुळे तो धृष्टद्युम्नाच्या तावडीत सापडला. हे वर्णन संजयाच्या वर्णनाशी सुसंगत नाही. द्रोणवधाचा सर्व तपशील कृष्ण सांगत बसला नाही हे खरे, पण त्याने निदान असे म्हणायला हवे होते, की द्रोणाने शस्त्रत्याग केल्यामुळे धृष्टद्युम्नाला त्याचा शिरच्छेद करता आला (द्रोणस्य न्यस्तशस्त्रस्य शिरः कायादपाहरत् — अशासारखे). खड्गाने द्रोणाचे शिर कापण्याचा प्रयत्न धृष्टद्युम्नाने आधीपण एकदा केला होता (७.१६४.१४५-१४९), पण त्यावेळी द्रोणाचार्यांनी शस्त्रत्याग केला नसल्यामुळे धृष्टद्युम्नाचा हेतू त्यांनी साध्य होऊ दिला नव्हता. दुसऱ्या खेपेस द्रोणाने शस्त्र खाली ठेवले होते (७.१६५.३३-३५) म्हणून धृष्टद्युम्नाला त्याचा कार्यभाग साधता आला. तेव्हा द्रोणवधाचे खरे कारण द्रोणाचा शस्त्रत्याग हे आहे, युद्ध करता करता ते थकले होते हे नव्हे. वसुदेवाला हकीकत सांगताना कृष्णाने पांडवांची बाजू फारच सावरून धरली आहे. शस्त्रत्याग केलेल्याचा वध करण्यात पराक्रम नाही,

अनुक्रमणिका







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

त्यामुळे कृष्णाने तसे सांगितले नाही.

(३) तिसरा फरक कर्णवधाचे वर्णन करण्याविषयीचा. कर्णवधाचे वेळी त्याच्या रथाचे चाक गर्तेत अडकल्याचे कृष्ण सांगत नाही. कृष्णाने युद्धाचा लहान-मोठा सर्वच तपशील गाळला असल्यामुळे त्या घटनेचा उल्लेख त्याच्या वर्णनात नाही हे ठीक. पण कर्णार्जुनाच्या युद्धाचे वर्णन करताना त्याने जे असे म्हटले आहे, की, एखादा पतंग अग्नीत पडून मरावा तसा कर्ण अर्जुनाशी लढताना मेला, ह्यात कर्णाच्या पराक्रमाचे त्याने भलतेच अवमूल्यन केले आहे. (ततः पार्थं समासाद्य पतंग इव पावकम्। पञ्चत्वमगमत् सौतिर्द्वितीयेऽहनि दारुणे १४.५९.२१). कर्णाचा वध करणे अर्जुनाला इतके सहजासहजी जमण्यासारखे नव्हते. तसे असते तर कर्णाच्या रथाचे चाक गर्तेत सापडले ती संधी साधून त्याला मार (७.१५५.२८) अशी सूचना कृष्णाने अर्जुनाला देऊन ठेवण्याचे काहीच कारण नव्हते. खेरीज कर्णार्जुनाचे युद्ध असे एकतर्फी झाले असते तर कृष्णाने त्याला 'दारुण' असे म्हणण्याचे काहीच कारण नव्हते. साधेसुधे योद्धे भीष्मादि मोठमोठ्या योद्ध्यांशी लढताना मरतात त्यावेळी अग्नि-पतंगाची, अग्नि-शलभाची उपमा महाभारतात अनेकवेळा येते. (६.११२.११०; ८.१७.११७; ६.७०.३२; ७.३५.२१ इत्यादि). कर्णार्जुनाचे युद्ध निश्चितच तसे नव्हते. शत्रूला इतके क्षुद्र लेखणे योग्य नव्हे. कृष्णाचा पांडवांच्या बाजूने पक्षपात इथे पुन्हा एकदा नजरेस येतो.

(४-५) ह्यानंतरचे दोन फरक दुर्योधनवधाविषयीचे आहेत. पहिला फरक रणांगण सोडून निघून गेलेला दुर्योधन पांडवांना कसा सापडला ह्यासंबंधीचा आहे. संजयाच्या हकीकतीप्रमाणे शकुनीचा पाडाव झाल्यावर दमलेला आणि घाबरलेला दुर्योधन रणांगणातून निघून जाऊन एका डोहात लपून बसला होता हे कुणालाच माहीत नव्हते. योगायोगाने भीमाच्या व्याधांना ती माहिती मिळाली आणि बक्षिसीच्या लोभाने त्यांनी ती पांडवांना सांगितली (९.२८.२५; ४९-५२; ९.२९.५-६, २२-४२). परंतु कृष्ण वसुदेवाला सांगतो ते असे : रणांगण सोडून पळणाऱ्या दुर्योधनामागे भीम धावला आणि त्याने दुर्योधनाला डोहात लपून बसताना पाहिले (निहते शकुनौ राजा धार्तराष्ट्रः सुदुर्मनाः। अपाक्रामद् गदापाणिर्हतभूमिष्ठसैनिकः।। तमन्वधावत् संक्रुद्धो भीमसेनः प्रतापवान्। ह्रदे द्वैपायने चापि सलिलस्थं ददर्श तम्।। १४.५९.२६-२७).

दुसरा फरक दुर्योधन गदायुद्धात कसा पडला त्याविषयीचा आहे. संजयाची माहिती सर्वश्रुत आहे. गदायुद्धात दुर्योधनाची सरशी होत असलेली पाहून काहीतरी अधर्माचरण करून भीमाने जय संपादन करावा अशी सूचना कृष्णानेच अर्जुनाला केली, आणि अर्जुनाने केलेल्या सूचनेचा अर्थ समजून, गदायुद्धाचा नियम डावलून, भीमाने दुर्योधनाच्या मांड्या फोडल्या. कृष्णाने वसुदेवाला हे सर्व जरी न सांगितले तरी निदान दुर्योधनाचा पाडाव होण्यासाठी भीमाने अधर्माचरण केले एवढे तरी म्हणायला हवे होते. पण तो सांगतो ते असे, की भीमाने पराक्रम करून दुर्योधनाला मारले (ततः स निहतो राजा धार्तराष्ट्रो महामृधे। भीमसेनेन विक्रम्य पश्यतां पृथिवीक्षिताम्।। १४.५९.३०). ह्या वर्णनात फार मोठा सत्यापलाप आहे. एका श्लोकातच सर्व हकीकत सांगायची होती तरी अधर्माचरणाचा संकेत कृष्णाला 'विक्रम्य' ऐवजी 'व्युत्क्रम्य' म्हणजे नियम मोडून असे म्हणून करता आला असता (ततः स निहतो राजा धार्तराष्ट्रो महामृधे। भीमसेनेन व्युत्क्रम्य पश्यतां पृथिवीक्षिताम्).

(६) युद्ध वर्णनातला शेवटचा फरक अभिमन्युवधाविषयीचा आहे. ह्या वर्णनात वरच्यासारखा फार मोठा सत्यापलाप झाला नसला तरी फरक निश्चित आहे. वसुदेवाला दुःख होईल म्हणून कृष्णाने प्रथम त्याला अभिमन्युवधाविषयी काही सांगितलेच नव्हते. सुभद्रेच्या ते लक्षात आले आणि तिने अभिमन्युवधाची माहिती वसुदेवास देण्यास कृष्णाला सांगितले. ही माहिती कृष्णाने आधीच्या वर्णनाच्या मानाने थोडी विस्ताराने दिली आहे. त्यात अभिमन्यूच्या पराक्रमांचे थोडे वर्णन आहे. पण अखेरीस त्याने सांगितले ते असे, की द्रोण आणि कर्ण यांनी अभिमन्यूची दमछाक केली आणि तशा स्थितीत तो दुःशासनपुत्राच्या तावडीत सापडला (खेदितो द्रोणकर्णाभ्यां दौःशासनिवशं गतः १४.६०.१७,२०).




मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वरील वर्णनात द्रोणाने रचलेल्या चक्रव्यूहाचा मुळीच उल्लेख नाही. अभिमन्युवधाविषयी माहिती देताना कृष्णाने ती थोड्या विस्ताराने दिली आहे, तेव्हा त्यात चक्रव्यूहाचा उल्लेख होण्यास हरकत नव्हती. अभिमन्यूचा वध होण्याचे ते एक प्रमुख कारण होते. चक्रव्यूहात शिरल्यावर अभिमन्यूने मोठाच पराक्रम केला ह्यात संशय नाही. परंतु 'अभिमन्यूने हजारो, शेकडो, भूमिपाल मारले' अशी अतिशयोक्ती कृष्णाने करण्याचे कारण नव्हते. (निहत्य पृथिवीपालान् सहस्त्रशतसंघशः १४. ६०.१७). अभिमन्यूने कौरवांकडील मारलेले योद्धे पुढीलप्रमाणे : अश्मकेश्वर(७.३६. २१-२२), सुषेण, कुण्डभेदिन् (धार्तराष्ट्र), दीर्घलोचन (धार्तराष्ट्र) (७.३६.२९), शल्याचा धाकटा भाऊ (७.३७.३,५), कर्णाचा धाकटा भाऊ (७.३९.३०, ७.४०.४-५), वसातीय (७.४३.८-११), सत्यश्रवस् (७.४४.३-४) शल्यपुत्र रुक्मरथ (७.४४.९, १३-१४), शल्यपुत्राचे शंभर मित्र (७.४४.१५-२८), दुर्योधनपुत्र लक्ष्मण (७.४५.१६-१७), क्राथपुत्र (७.४५.२५), वृन्दारक (७.४६.१२), कोसलराजपुत्र बृहद्बल (७.४६.२०-२२), मगधराजपुत्र अश्वकेतु (७.४७.७), शत्रुंजय, चंद्रकेतु, मेघवेग, सुवर्चस्, सूर्यभास् हे पाच कौरववीर (७.४७.१५), आणि सुबलपुत्र कालकेय (७.४८.७-८). ह्या खेरीज इतर अनेक द्वंद्वयुद्धे अभिमन्यूने केली. तेव्हा त्याचा पराक्रम फार मोठा होता ह्यात संशय नाही. पण त्या वर्णनासाठी अभिमन्यूने 'हजारो', 'शेकडो' भूमिपाल मारले अशी अतिशयोक्ती करण्याचे कारण नाही.

दुसरे असे की अगदी संक्षिप्त वर्णनातसुद्धा अभिमन्यूची दमछाक अखेर द्रोण व कर्ण दोघांनीच केली हे म्हणणे आधीच्या वर्णनाशी विसंगत आहे. अभिमन्यूवधाची मसलत द्रोण व कर्णात झाली एवढे म्हणणे योग्य ठरेल. पण त्या दोघांनीच त्याला दमविले असे झाले नव्हते. संजयाचे द्रोणपर्वातले वर्णन असे आहे : अभिमन्यू कोणाला आटपत नाही असे पाहून कर्णाने द्रोणास अभिमन्यूवधाचा उपाय विचारला. तेव्हा द्रोणाने सल्ला दिला तो असा : अभिमन्यूने अभेद्य कवच धारण केले असल्यामुळे बाण मारून अभिमन्यूचा वध करणे कुणालाही जमणार नाही. शक्य असेल तर कर्णाने त्याचे धनुष्य तोडावे आणि रथाचे घोडे, आणि पार्ष्णिसारथी मारावेत. अशा तऱ्हेने धनुष्य-बाणाने युद्ध करणे अभिमन्यूला अशक्य झाले म्हणजे पायउतार होवून तो खड्ग, चक्र, गदा असे काही तरी दुसरे आयुध घेऊन लढू लागेल आणि त्यावेळी त्याच्यावर प्रहार करणे शक्य होईल (सधनुष्को न शक्योऽयमपि जेतुं सुरासुरैः। ....विरथं विधनुष्कं च कुरुष्वैनं यदीच्छसि ७.४७.१७, २६-३०). ह्या सल्ल्यानंतर अभिमन्यूला सहा वीरांनी घेरले, आणि कर्णाने त्याचे धनुष्य, कृपाचार्याने पार्ष्णिसारथी, आणि भोजाने (कृतवर्म्याने) घोडे मारले (७.४७.३१-३३). अपेक्षेप्रमाणे विरथ झाल्यावर अभिमन्यूने खड्ग-चर्म हातांत घेतले, ते द्रोणाने कापले (७.४७.३७). त्याने रथाचे चाक उचलले तेव्हा अनेकांनी बाण मारून चाकाचेही तुकडे केले (७.४८.३). अखेर अभिमन्यूने गदा उचलली आणि गदेने दौःशासनीशी युद्ध चालू असताना दुर्दैवाने त्याचा अंत झाला (७.४८.१२). ह्या वर्णनाच्या अखेरीस असे म्हटले आहे, की द्रोण-कर्णादि महावीर अभिमन्यूच्या पाडावास कारणीभूत झाले (द्रोणकर्णमुखैः षड्भिर्धार्तराष्ट्रैर्महारथैः। एकोऽयं निहतः शेते ७.४८.२१,१३). संजयाने सांगितलेली ही सर्व हकीकत वाचल्यावर नुसत्या द्रोण व कर्ण या दोघांनी अभिमन्यूला दमविले असे म्हणणे सत्याला सोडून आहे असे निश्चितच वाटते.

कृष्णाने पुढे वसुदेवास असेही सांगितले की, अभिमन्युवधानंतर सुभद्रा अतिशय शोक करू लागली, तेव्हा कुंतीने तिचे सांत्वन केले आणि पांडवांच्या संमतीने दाने देऊन अभिमन्यूचे कुंतीने श्राद्ध केले (विहाय शोकं दुर्धर्षं श्राद्धमस्य ह्यकल्पयत्।। ....ददौ दानान्यनेकशः।। १४.६०.३१-३८). परंतु हे सर्व कसे शक्य होते? आधीच्या संजयकृत वर्णनात कुंतीचा उल्लेखच नाही, आणि तो नाही हेच बरोबर आहे, कारण युद्धाचे वेळी कुंती हस्तिनपुरास होती, कुरुक्षेत्री पांडवांच्या शिबिरात नव्हती. संजयाच्या वर्णनाप्रमाणे सुभद्रेचे, तसेच द्रौपदीचे आणि उत्तरेचे सांत्वन अर्जुनाच्या सांगण्यावरून कृष्णाने केले (७.५४.९-२६;७.५५.१-४०). तसेच आधीच्या वर्णनात कोणत्याही



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

वीराच्या मृत्यूनंतर झालेल्या श्राद्धाचा उल्लेख नाही, तसाच अभिमन्यूच्या वधानंतर झालेल्या श्राद्धाचाही नाही. परंतु कृष्णाने तो केला आहे.

(७) कृष्णाच्या हकीकतीत आणखी एक लहानसा पण उल्लेखनीय फरक आहे तो युद्धानंतर कौरवांकडे अखेर किती उरले यांच्या संख्येविषयीचा. म्हटलेच तर हा फरक म्हणजे विसंगती अशी नाही, आधीच्या हकीकतीची थोडी दुरुस्ती आहे. युद्धानंतर किती उरले ह्या विषयी महाभारतात आधी माहिती आहे ती अशी : पांडवांकडील सात (पांच पांडव आणि कृष्ण व सात्यकि) आणि कौरवांकडील तीन उरले - अश्वत्थामा, कृप आणि कृतवर्मा. अश्वत्थामा स्वतःच शिबिरातल्या संहारानंतर दुर्योधनाला सांगतो : दुर्योधन जीवसि चेद् वाचं श्रोत्रसुखां शृणु। सप्त पाण्डवतः शेषा धार्तराष्ट्रास्त्रयो वयम्।। ते चैव भ्रातरः पञ्च वासुदेवोऽथ सात्यकिः। अहं च कृतवर्मा च कृपः शारद्वतस्तथा।। १०.९.४७-४८; तसेच संजयाने धृतराष्ट्रास सांगितले ९.१.३३-३४). परंतु वसुदेवाला कृष्ण सांगतो की, पांडवांकडील सात, आणि कौरवांकडील कृप, कृतवर्मा, अश्वत्थामा यांखेरीज युयुत्सु असे चौघेजण वाचले. युयुत्सु वाचण्याचे कारण धृतराष्ट्राचा वैश्यापुत्र युयुत्सु युद्ध सुरू होण्यापूर्वी कौरवांची बाजू सोडून पांडवांकडे आला होता (युयुत्सु चापि कौरव्यो मुक्तः पांडवसंश्रयात् १४.५९.३३; ह्याविषयीची हकीकत पृ. ६.४१.८९-९५). कृष्णाने सांगितले ते खोटे नव्हते. युयुत्सूने कौरवांची बाजू सोडली असल्यामुळे त्याला क्षुल्लक मानून कौरवांकडील उरलेल्यांत त्याची गणना अश्वत्थाम्याने न करणे, पण कृष्णाने ती करणे हे समजण्यासारखे आहे.

(८) कृष्णाच्या हकीकतीचा शेवटचा विशेष कौरवांकडे व पांडवांकडे प्रत्येक वेळेस नवा सेनापती नेमायच्या वेळी किती सैन्य उरले ही नेमकी संख्या सांगण्याविषयीचा. कृष्णाने दिलेल्या आकडेवारीप्रमाणे कौरवांकडे सुरुवातीस अकरा अक्षौहिणी सेना होती. पुढे भीष्मपतनानंतर द्रोण सेनापती झाला तेव्हा नऊ अक्षौहिणी, कर्ण सेनापती झाला तेव्हा पाच, आणि शल्य सेनापती झाला तेव्हा तीन अक्षौहिणी सेना उरली. ही उरलेली सेना शल्य युद्ध करत असताना आणि तो पडल्यानंतर झालेल्या धुमच्चक्रीत जवळ जवळ सर्व नष्ट झाली. (१४.५९.८,१४,१९,२२). आपणास ह्या आकड्यांचा शब्दशः अर्थ घेण्याचे कारण नाही. पण त्याचा अर्थ असा की, पहिल्या दहा दिवसात कौरवांची सुमारे दोनच अक्षौहिणी सेना कामास आली, तर नंतरच्या पाच दिवसात चार अक्षौहिणी, पुढच्या दोन दिवसांत दोन, आणि शेवटच्या एका दिवसात तीन अक्षौहिणी सेना गारद झाली. युद्धाचा घनघोरपणा उत्तरोत्तर कसा वाढत गेला आणि अखेरच्या दिवशी कशी शर्थ झाली हे ह्यावरून लक्षात येते. कृष्णाच्या हकीकतीप्रमाणे पांडवांकडे प्रथम शिखण्डी हा सात अक्षौहिणी सेनेचा अधिपती होता. दहा दिवसांच्या युद्धानंतर अकराव्या दिवशी धृष्टद्युम्न सेनापती झाला तेव्हा पांडवसेना पाच अक्षौहिणी, पुढे अर्जुन सेनापती झाला तेव्हा तीन, आणि अखेर युधिष्ठिर सेनापती झाला तेव्हा एक अक्षौहिणी सेना उरली. (१४.५९.९, १८, २०,२३). ह्याचा अर्थ परत असा की, पहिल्या दहा दिवसात पांडवांची सुद्धा कौरवांच्या इतकीच दोन अक्षौहिणी सेना कामास आली, आणि नंतरच्या प्रत्येक सेनापतिबदलाच्या वेळी तितकीच म्हणजे दोन अक्षौहिणी सेना नाश पावली.

इतका व्यवस्थित हिशेब आधीच्या संजयाच्या वर्णनात नसल्यामुळे कृष्णाचे वर्णन वस्तुस्थितीशी सुसंगत आहे की, त्यात काही कृत्रिमता आहे हे कळत नाही. भीष्म सेनापती होते त्यापेक्षा द्रोण सेनापती झाल्यावर युद्ध जास्त चुरशीचे झाले हे सत्य असल्यामुळे त्या पाच दिवसात कौरवांची चार अक्षौहिणी सेना नाश पावली ह्या कृष्णाच्या सांगण्यात तथ्य असावे असे वाटते.

कौरवांच्या सेनेच्या दृष्टीने संजयाच्या वर्णनात फक्त काही त्रोटक उल्लेख आहेत. कर्ण सेनापती असताना भीमाने एकदा कौरवांच्या तीन अक्षौहिणी सेनेला आवर घातला असे म्हटले आहे (अक्षौहिण्यस्तथा तिस्रो धार्तराष्ट्रस्य संहताः। क्रुद्धेन नरसिंहेन भीमसेनेन वारिताः।। ८.४३.७५). त्याचा अर्थ कर्ण सेनापती झाला तेव्हा कौरवांकडे तीन अक्षौहिणी सेना होती असे म्हणायचे का? कृष्णाच्या सांगण्याप्रमाणे ती पाच अक्षौहिणी होती. पण भीमाने आवर घेतलेली कौरवांची सेना ही त्या सेनेचा

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थाद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई
अनुक्रमणिका

एक भाग होती असेही म्हणणे शक्य आहे. मग कृष्णाचे सांगणे अवास्तव नव्हते असे म्हणता येईल.

जयद्रथवधाबद्दल द्रोणाला बोल लावताना संजयवर्णनात दुर्योधन म्हणतो, की अर्जुनाने सात अक्षौहिणी सेना मारून जयद्रथाचा वध केला (सव्यसाचिना। अक्षौहिणीः सप्त हत्वा हतो राजा जयद्रथः।। ७.१२५.१२). एका दिवसात अर्जुन एवढी मोठी सेना मारणे शक्य नाही. त्या दिवसाच्या युद्धवर्णनात अर्जुनाने फार मोठी सेना मारल्याचा उल्लेखही नाही. चौदा दिवसांत युद्धात कौरवांची सात अक्षौहिणी सेना नाश पावली - अर्जुनाचे नाव घेतले असले तरी एकट्या अर्जुनाने ती मारली असे नव्हे - असा अर्थ केला तर कृष्णाच्या वर्णनाशी हे विधान फारसे विसंगत ठरत नाही.

कौरवांच्या सेनेबद्दल संजयाच्या वर्णनात आणखी काही उल्लेख आहेत ते अतिशयोक्तिपूर्ण आणि सर्व सामान्य स्वरुपाचे आहेत असेच म्हणावे लागते. उदाहरणार्थ युद्धाच्या आठव्या दिवशी आणि अकराव्या दिवशीही कौरवांची सेना अकरा अक्षौहिणी आहे असे दुर्योधन म्हणतो ह्याचे आश्चर्य वाटते (६.९१.५; ७.५.२८). तसेच चौदाव्या दिवशी सुद्धा जयद्रथाच्या संरक्षणासाठी कौरवांच्या सर्व अकरा अक्षौहिणी सेना सज्ज असल्याचे दुर्योधन (७.५२.१९) आणि अर्जुनही (७.५७.१२) म्हणतो हे आश्चर्य नाही का? अर्जुनाने त्या दिवशी अकरा अक्षौहिणी सेनेचा पराभव केला असा उल्लेख आणखीही अेकदा संजयाने केला आहे (८.४.१२). कौरवांची सेना म्हटली की ती अकरा अक्षौहिणी असे समीकरण ठसून गेल्यामुळे हे असे उल्लेख झाले असावेत असे वाटते. हे झाले संजयवर्णनातले कौरवांच्या सेनेविषयी उल्लेख.

पांडवांच्या सेनेविषयी देखील आधीच्या संजयवर्णनात नेमके असे काही सांगितले नाही. दुर्योधनाजवळ कबूल केल्याप्रमाणे भीष्माने एकट्याने पहिले दहा दिवस दररोज दहा सहस्र म्हणजे एकंदर एक लाख सैनिक मारले (६.१०५.२५; ६.११३.२०). एक लक्ष म्हणजे अर्धा अक्षौहिणी. इतरही वीरांनी मिळून तितकेच किंवा त्यापेक्षा जास्त सैनिक मारले असे म्हटले तर पहिल्या दहा दिवसात पांडवांची दोन अक्षौहिणी सेना कामी आली ह्या कृष्णाच्या विधानाशी हा हिशेब साधारण जुळतो. पुढे द्रोणाने एकट्याने पांडवांकडील एक अक्षौहिणीपेक्षा जास्त सेना त्याच्या मृत्युपूर्वी मारली (७.७.३१) आणि अश्वत्थाम्याने एक अक्षौहिणी सेना मारली असे उल्लेख आहेत (७.१७२.३०, ३४,४८). त्यावरून पांडवांकडील सेना द्रोण सेनापती असताना दोन अक्षौहिणीपेक्षा जास्त निकामी झाली असा अर्थ होईल. कृष्णाने जवळ जवळ तसाच हिशेब सांगितला असल्याने ह्याबाबतीतही कृष्णाच्या वर्णनात विसंगती दिसत नाही. तेव्हा सेनासंख्येविषयी कृष्णाची माहिती ढोबळ मानाने आधीच्या वर्णनाशी मिळतीजुळती आहे असे म्हणण्यास हरकत नाही.

✠✠✠

**तळटीप**

१. रणांगणावर मांड्या फुटल्यामुळे पडलेला दुर्योधन शिबिरात मारला गेलेल्या धृष्टद्युम्नाचा उल्लेख 'क्षुद्र सेनापती' असा करतो (१०.९.५४). तेव्हा वध होईपर्यंत धृष्टद्युम्नाकडे सेनापतिपद चालू होते हे स्पष्ट होते.

✠✠✠

अनुक्रमणिका





राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

# काल, आज आणि उद्या

# जागतिकीकरणाच्या संदर्भात उच्च शिक्षण

साक्षी

जागतिकीकरणाकडे वळण्यापूर्वी आपण उच्चशिक्षणाकडे पाहण्याचे दोन परस्परविरोधी दृष्टिकोण आहेत, त्यांची माहिती करून घेतली पाहिजे. जागतिकीकरणाचा संदर्भ न घेताही हे दृष्टिकोण आपण मांडू शकतो. मात्र या दृष्टिकोणांपासून जी निष्पन्ने होतात त्यांच्यातील विरोध जागतिकीकरणामुळे अधिक स्पष्टपणे कळून येतो. त्यामुळे आपण या दृष्टिकोणांची समग्र मांडणी करणे अगत्याचे आहे.

१.

पहिल्या दृष्टिकोणानुसार उच्च-शिक्षण म्हणजे महाविद्यालये किंवा विद्यापीठे अशा ठरीव ठिकाणी विद्यार्थी व शिक्षक यांच्यात होणारी देवाण-घेवाण होय. या देवाण घेवाणीत शिक्षक विद्यार्थ्याला विशिष्ट शिक्षण देतो आणि विद्यार्थी ते शिक्षण घेतो. या शिक्षणामुळे विद्यार्थ्याच्या ठिकाणची काही कौशल्ये विकसित होतात आणि त्या कौशल्यांच्या योगाने विद्यार्थी नोकरी मिळवू शकतो. उच्च शिक्षणाचे हे जे संकल्पन आहे त्यापासून दोन निष्कर्ष निघतात. पहिला असा की, एखाद्या विद्यापीठातून शिकून बाहेर पडणाऱ्या विद्यार्थ्याला चांगली नोकरी मिळत असेल, तर ते विद्यापीठ चांगले. दुसरा निष्कर्ष असा की, नोकऱ्यांच्या बाजारात उपलब्ध असणाऱ्या नोकऱ्यांची प्रतवारी लावता येत असल्यामुळे आपल्याला विद्यापीठांचीही प्रतवारी लावता येते. त्यामुळे जगातील सर्व विद्यापीठांची क्रमवारी लावता येते. जेव्हा, या जागतिक क्रमवारीतील पहिल्या दोनशे विद्यापीठात भारतातील एकही विद्यापीठ बसत नाही यासाठी लोक दु:ख व्यक्त करतात तेव्हा त्यांनी उच्च-शिक्षणाविषयीचे हे पहिले संकल्पन स्वीकारलेले असते. अनेक शैक्षणिक संस्थांतून हल्ली नोकरी मिळवून देणारी केंद्रे उघडली जातात; तेव्हा देखील त्या संस्था उच्च-शिक्षणाविषयीचा हा दृष्टिकोण बाळगूनच कार्य करीत आहेत, हे स्पष्ट होते.

या दृष्टिकोणाच्या विरोधात दुसरा एक दृष्टिकोण आहे. तो असे मानतो की, उच्च शिक्षण म्हणजे शिक्षक व विद्यार्थी यांनी समाजाच्या वतीने चालविलेले एक कार्य आहे. उच्च शिक्षण ही काही देवाण-घेवाण नव्हे. या दृष्टिकोणानुसार उच्च-शिक्षण या समाजात "जैविक विचारवंत" (ऑर्गनिक इंटलेक्चुअल्स) निर्माण करण्याचा कार्यक्रम आहे. "जैविक विचारवंत" हा आन्तोनियो ग्रामशी या पंडिताने वापरलेला शब्दप्रयोग आहे.

कोणी विचारील की, शिक्षक आणि विद्यार्थी मिळून जे कार्य करितात त्याचा आणि समाजाचा संबंध काय? याचे उत्तर असे की, एखाद्या देशाची आर्थिक उन्नती व्हावी एवढ्यासाठीच उच्च शिक्षण उपयोगी असते, असे नाही. समाजाच्या स्वातंत्र्याशी उच्च शिक्षणाचा निकट संबंध आहे. उच्च शिक्षणाचे प्रांगण नवनवीन कल्पनांनी कायम गजबजलेले असले पाहिजे. हे प्रांगण आकसत जाणे व नष्ट होणे याचा अर्थ असा की, समाज केवळ दुसऱ्यांनी प्रसविलेल्या कल्पनांवर निर्वाह करू लागला आहे. असा बांडगुळी समाज स्वतंत्र राहू शकत नाही. दादाभाई नौरोजी किंवा रमेशचंद्र दत्त यांनी परकीय विचारांचे जोखड बाजूला ठेवून जेव्हा भारताचे शोषण होत आहे ही नवी कल्पना मांडली, तेव्हा स्वातंत्र्याच्या चळवळीला खरे तेज चढले.

दादाभाई नौरोजी व रमेशचंद्र दत्त यांच्या काळातील शिक्षणसंस्थांतून जी वैचारिकता होती तिचा उद्देशच साम्राज्यवादी राजवट ही भारतीय समाजाच्या कल्याणाची आहे, असे दाखविण्याचा होता आणि त्या शिक्षणसंस्थांचा हेतू साम्राज्यवादी राजवटीचे हितसंबंध सांभाळणारे शिक्षित लोक तयार करण्याचा होता. त्या शैक्षणिक धोरणाची घडणच मुळी साम्राज्यवादी राजवटीसाठी 'जैविक विचारवंत' निर्माण करण्यासाठी

अनुक्रमणिका







राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

झाली होती. पुढे गांधीजींनी या सरकारी शिक्षणसंस्था सोडण्याची हाक विद्यार्थ्यांना दिली. रवींद्रनाथ टागोर यांना देखील गांधीजींचे आवाहन पटले नव्हते. पण त्या वेळी गांधीजींचा उद्देश हाच होता की, मानसिक गुलामीतून विद्यार्थ्यांची सुटका झाली पाहिजे. गांधीजी सरकारी शिक्षणसंस्था सोडण्याची हाक देऊन थांबले नाहीत; त्यांनी परावलंबी विचाराची सवय सुटून स्वावलंबी विचारांचे पोषण होईल असे शिक्षण देणाऱ्या पर्यायी शिक्षणसंस्था सुरू केल्या. स्वतंत्र विचारसरणींचे जतन व वर्धापन स्वातंत्र्याच्या चळवळीसाठी महत्त्वाचे होतेच, पण आता स्वातंत्र्याच्या रक्षणासाठीही या गोष्टी महत्त्वाच्या आहेत. आता, स्वतंत्र झाल्यानंतर, स्वतंत्र व स्वयंभू विचारांची निर्मिती व जोपासना जिथे होईल अशा शिक्षणसंस्था उभारण्यात आपल्याला मोकळीक आहे; म्हणून आपण अशा संस्थांची उभारणी केली पाहिजे.

उच्च शिक्षणाविषयीचा हा दुसरा दृष्टिकोण प्रथमदर्शनी चमत्कारिक वाटण्याचा संभव आहे. उच्च-शिक्षणातून आपण विद्यार्थ्यांना काही कौशल्ये शिकवीत नाही का? काळाबरोबर गरजा बदलतात; गरजात पडलेले हे फरक बाजारपेठेतील मागणी व पुरवठा यावरून स्पष्ट होतात; या गरजा भागविण्याचे काम उच्च शिक्षणाने करावयाचे असते की नाही? "लोकांचे स्वातंत्र्य", "जैविक विचारवंत" अशा सारखे जडजंबाल शब्द-प्रयोग विज्ञान, तंत्रज्ञान किंवा व्यवस्थापन अशा अभ्यास विषयात येत नाहीत; त्यांची जागा समाज-विज्ञान व मानव्य या विषयगटात येते. मग तुम्ही आता असे सांगू इच्छिता का, की विज्ञान-तंत्रज्ञान-व्यवस्थापन यांच्या पेक्षा समाजविज्ञान व मानव्य यांचा अभ्यास अधिक महत्त्वाचा आहे? हे व्यावहारिक प्रश्न बाजूला ठेवले तरी कोणत्याही विषयात अशी सत्ये नक्कीच असतात की, ज्यांच्यामुळे, त्या विषयांचा अभ्यास राष्ट्रे व समाज यांच्या मर्यादा ओलांडून सार्वत्रिक होऊ शकतो व त्यामुळे त्या विषयांच्या अभ्यासकांनाही अमुक देशाचे वा अमुक समाजाचे अशी गटवारी लावता येत नाही. असे असताना तुम्ही 'स्वावलंबी व स्वयंभू विचार' याची महती कशी सांगता?

आमचे म्हणणे असे की, आम्ही जो दृष्टिकोण सांगत आहोत, त्याच्या विषयीच्या वरील शंका पूर्णपणे अनाठायी आहेत. ग्रामशीने "जैविक विचारवंत" ही संकल्पना मांडली तिला कोणताही उच्चभ्रूपणाचा दर्प चिकटलेला नाही. या संकल्पनेत साहित्यिक, तंत्रज्ञ, शिक्षणवेत्ते, शास्त्रज्ञ, व्यावसायिक, प्रशासक, अभियंते, वैद्य अशा सर्वांचा समावेश होतो. वर जे दृष्टिकोण सांगितले आहेत. त्यापैकी एक अमुक 'अ, ब, क' विषयांच्या अभ्यासाला महत्त्व देतो व दुसरा 'ड, ई, फ' अशा विषयांचे महत्त्व सांगतो अशातला भाग नाही. फरक असा आहे की, पहिला दृष्टिकोण उच्च शिक्षणाला 'काही कौशल्ये संक्रांत करण्याचा उद्योग' इतका संकुचित अर्थ देतो; तर दुसरा दृष्टिकोण ज्या सामाजिक माहौलामध्ये 'कौशल्य-संक्रमण' होत आहे त्या माहौलाचे महत्त्वही विचारात घेतो. दुसरा दृष्टिकोण असे सांगत नाही की, उच्च शिक्षणातून काही कौशल्ये विद्यार्थ्यांच्या ठिकाणी बाणवताना शिक्षकांनी समाजमनस्कता किंवा लोकां-विषयीची कळकळ यांच्या विषयी प्रवचने झोडावीत किंवा समाजाविषयीचे विशिष्ट सिद्धान्त अगर ध्येयवाद विद्यार्थ्यांच्या गळी उतरवावेत. जो दुसरा दृष्टिकोण वर मांडला आहे तो असे सुचवितो की, केवळ बाजारात काय विकले जाते इतकेच पाहू नका; विषयाच्या तांत्रिक तपशिलाचे ज्ञान द्याच, पण तेवढ्यावर समाधानी न राहता त्याला अधिक चौरस बनवा; आपण ज्या समाजात राहतो त्या समाजाच्या गरजांचे व सामर्थ्याचे भान विद्यार्थ्यांच्या ठिकाणी रुजवा; विशिष्ट विषयांचा अभ्यास करताना संशोधनासाठी असे प्रश्न निवडा की, ज्यांचा समाजाच्या गरजांशी काही संबंध असेल; अमुक एक प्रश्न परदेशात महत्त्व पावला आहे म्हणून तो संशोधनासाठी उचलला असे होऊ नये.

या शेवटच्या मुद्द्याविषयी काही लोक असे विचारतील की, विज्ञान हा विषय सार्वत्रिक आहे. त्याला देशाच्या किंवा समाजाच्या सीमा अडवू शकत नाहीत. त्यामुळे शास्त्रज्ञ हे अमक्या-तमक्या देशाचे किंवा समाजाचे नसतात. विज्ञानाच्या अभ्यासातून निघाणारे निष्कर्ष सार्वत्रिक असतात. हाच मुद्दा काही प्रमाणात सामाजिक शास्त्रांविषयीही मांडता येईल. त्यातून निष्पन्न

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

होणारे कित्येक निवाडे देखील सार्वत्रिक असतात. पण आता आमचा मुद्दा वेगवेगळ्या शास्त्रातून प्राप्त होणारी निष्पत्ते सार्वत्रिक असतात की नाही, हा नाही; तर संशोधनासाठी कोणते प्रश्न निवडावेत, हा आहे. सामाजिक शास्त्रातील व विज्ञानातील प्रश्न, उदा. फळ खाली का पडते व मंदी कशामुळे येते, विकसित व विकसनशील अशा दोन्ही प्रकारच्या समाजांना समाईक आहेत; पण मलेरियाचा प्रसार कसा रोखावा, यासारख्या प्रश्नाला विकसनशील देशाला जे महत्त्व आहे ते विकसित देशात नाही. त्यामुळे आपल्या देशातील अभ्यासकांनी असे प्रश्न संशोधनासाठी निवडले पाहिजेत. याच विचाराचा एक उपसिद्धान्त असा की, विज्ञानाचे अभ्यासकही सर्व देशात एकसारखे असणे बरोबर नाही. जे. डी. बेर्नाल या विख्यात शास्त्रज्ञाने असेच मत मांडले होते.

२

उच्च शिक्षणाचे हे जे दुसरे संकल्पन आहे ते आपल्या देशाचे आधुनिक राष्ट्र म्हणून संघटन होण्यास आधार झाले होते. यासाठी या दुसऱ्या संकल्पनाचा आणखी विस्ताराने विचार केला पाहिजे. हे संकल्पन अनेक समजुतींना ठुकारून लावते अशी समजूत आहे. उच्च-शिक्षण देणाऱ्या ज्या संस्था आहेत त्या ज्या समाजासाठी काय करतात त्या समाजाचा संदर्भ विसरून या संस्थांची प्रतवारी लावता येते. आपण उच्च शिक्षणाचे जे संकल्पन मांडले आहे, त्याच्या सहाय्याने ही प्रतवारी करण्याची कल्पना फेटाळता येते. आपल्या संकल्पने-प्रमाणे प्रत्येक उच्च शिक्षण संस्था, ती ज्या समाजासाठी काम करते त्या समाजाशी जैविक नात्याने जोडलेली असते. या समाजांची उद्दिष्टे ही जर अगदी वेग-वेगळी व परस्परांशी तुलना न करता येण्यासारखी असतील तर, साहजिक, त्या समाजांशी जोडल्या गेलेल्या संस्थाही परस्परांशी तुलना करता येणार नाही अशा असणार. मग अशा शिक्षणसंस्थांची प्रतवारी किंवा अनुक्रम लावण्याचा प्रश्न येतोच कुठे? त्यामुळेच "जादवपूर विद्यापीठ व जवाहरलाल नेहरू विद्यापीठ यांनी हार्वर्डचे अनुकरण केले पाहिजे," " विकसित देशातील शिक्षणसंस्थांकडून आपण नवीन कल्पना उचलल्या पाहिजेत व तेथील प्राध्यापकांना इथे (शिकवायला) बोलावले पाहिजे," "जगातील उत्कृष्ट शिक्षणसंस्थांकडून आपल्या शिक्षणसंस्थांना किती मान्यता मिळते ते पाहिले पाहिजे", अशा सारखी जी शेरेबाजी ऐकायला मिळते, ती, आपण जो दुसरा दृष्टिकोण मांडला आहे त्याच्या आधाराने, अनाठायी ठरते. उच्च-शिक्षण ही काही एकविध (होमोजिनिअस) वस्तू आहे आणि ती वस्तू उत्पन्न करणारे कारखाने बरे-वाईट काम करतात अशा समजुतीतून ह्या टीका-टिपण्या केल्या जातात. पण आपण जर उच्च शिक्षण संस्थेकडे त्या समाजातील "जैविक विचारवंत" निर्माण करणारी संस्था म्हणून पाहू लागलो तर वरील टीका निरर्थक होईल. वर आम्ही दादाभाई नौरोजी व रमेशचंद्र दत्त यांचा उल्लेख केला. हार्वर्ड किंवा केंब्रिज विद्यापीठात, आधुनिक भारताच्या इतिहासाचा अभ्यास करणारे लोक वगळता, कोणालाच या दोघांची माहिती असण्याची शक्यता नाही. आपल्या शिक्षणसंस्थांची घडण हार्वर्ड किंवा केंब्रिज यांच्या धर्तीवर करण्याचे ठरले आणि तेथील अभ्यासक्रम आम्ही शिकविणार असा आग्रह आपण धरला तर आपल्या थोर पूर्वसूरींनी उभारलेल्या संकल्पनांच्या व्यूहाला आपल्याला तीलांजली द्यावी लागेल.

'अर्थशास्त्र' व 'राज्यशास्त्र' या सारख्या विषयास व्यावसायिकता (प्रोफेशनॅलायझेशन) या गोष्टीला वाव असू शकतो, हे आपण ज्या दुसऱ्या दृष्टिकोणाचे विवरण करीत आहोत त्याला मान्य नाही. अशा शास्त्रात आणि इतर शास्त्रातही जी 'व्यावसायिकता' आहे तिचे मानदंड विकसित देशांनी घालून दिले आहेत. त्यामुळे या शास्त्रातील 'व्यावसायिक' म्हणून मिळणाऱ्या मान्यतेसाठी आपल्याला स्वतंत्र विचार सोडून उधार कल्पनांची पोपटपंची करावी लागेल. जर या उधार कल्पना खरोखरच शास्त्रपूत असतील तर त्या उधारीलाही हरकत असण्याचे कारण नाही. पण होते काय की, या कल्पनांना विकसित राष्ट्रांच्या वर्चस्वाची राखण करण्यासाठी वापरलेले असते. विशेषतः सामाजिक शास्त्रांच्या बाबतीत असे हटकून होत असते. याचा अर्थ असा नाही की, विकसित देशातील प्रत्येक संशोधक हा जाणून बुजून अशा


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

विकसित राष्ट्रांच्या वर्चस्वाला हातभार लावत असतो. पण सामाजिक शास्त्रांतील संशोधनात तुम्हाला मान्यता मिळवायची असेल तर तुम्हाला संशोधनासाठी नेमके असेच प्रश्न निवडावे लागतात की, जिथे विकसित राष्ट्रांच्या वर्चस्ववादी विचारसरणीपुढे प्रश्न चिन्ह उभे करण्याची वेळच येऊ नये. या प्रश्नांच्या परीघाबाहेर जाऊन तुम्ही दुसरे असे काही प्रश्न संशोधनासाठी निवडलेत, की ज्यांचा विचार करताना या वर्चस्व वादाला आव्हान द्यावे लागेल, की तुमच्या संशोधनाबाबत होणारी प्रतिक्रिया फार विचित्र होताना आढळेल. तुमच्या संशोधनाबाबत अस्वस्थता किंवा आश्चर्य व्यक्त केले जाईल. कदाचित, जाणकार त्याविषयी बोलण्याचे टाळतील किंवा बोललेच तर त्याची खिल्ली उडवतील. चक्क दारुण विरोधाला तुम्हाला तोंड द्यावे लागेल आणि तुमची पदच्युती देखील होईल. त्यामुळे निस्पृह अशा संशोधकाला देखील सोयीचा असाच विषय संशोधनासाठी निवडावा लागतो. ही झाली विकसित देशातील गोष्ट. आपल्या देशात अशी स्थिती आहे, की आपल्या शिक्षणसंस्थांतून, निदान सामाजिक शास्त्रांच्या क्षेत्रात तरी, पाश्चात्त्य देशातील सैद्धान्तिक सनातन्यांचा प्रभाव काहीसा कमी आहे. तेव्हा आपण स्वतःहून व्यावसायिकतेची कास धरणे याचा अर्थ आपणहून शरणागती पत्करण्यासारखे होईल.

विकसित देशांकडून मिळालेली मान्यता हिला काही विशेष महत्त्व आहे, असे आमचा हा नवा दृष्टिकोण मानत नाही. निदान सामाजिक शास्त्रांच्या बाबतीत जर तुम्हाला अशा तऱ्हेची मान्यता मिळाली असेल, तर त्याचा अर्थ इतकाच होतो की, तुम्ही त्या देशांनी जे पक्षपाती निकष ठरविले आहेत त्यांना धरून संशोधन करीत आहात आणि विकसित देशांच्या वर्चस्वाला आव्हान देणाऱ्या संकल्पना तुम्ही स्वतःहून बासनात गुंडाळल्या आहेत. पाश्चात्त्यांकडून मिळणाऱ्या 'मान्यते'ला महत्त्व देण्याची ही प्रथा, दुर्दैवाने आपल्या देशात सर्वत्र पसरली आहे. आपण जेव्हा निवड समितीवर उमेदवारांची परीक्षा करायला बसतो तेव्हा ज्याचा निबंध परदेशी शोध-नियतकालिकात प्रसिद्ध झाला असेल त्या उमेदवाराला ज्याचा निबंध देशी शोध-नियतकालिकात प्रसिद्ध झाला आहे अशा उमेदवारापेक्षा जास्त पसंती देतो. आपण प्रसिद्ध झालेल्या निबंधांच्या गुणवत्तेचा विचारही करीत नाही. असे करून आपण स्वतंत्र विचारांना पायबंद मात्र घालत असतो.

उच्च शिक्षणाविषयीचा आमचा हा जो दृष्टिकोण आहे त्यापासून निघणारा चौथा निष्कर्ष असा की, शिक्षणाच्या क्षेत्रात ज्या खाजगी संस्था कार्यरत आहेत त्यांचे महत्त्व आम्ही सरकारी शिक्षणसंस्थांपेक्षा कमी लेखतो. शिक्षणाचे खाजगीकरण करणे याचाच अर्थ शिक्षणाला विकाऊ वस्तूचे रूप देणे होय. एखादी वस्तू विकाऊ आहे याचाच अर्थ असा की, तिचे उत्पादन करताना उत्पादकाने गिऱ्हाईकाच्या पसंती-नापसंतीचा विचार केला आहे. गिऱ्हाईकाच्या पसंतीचा विचार करून दिले जाणारे शिक्षण आणि लोकांच्या हितासाठी दिलेले शिक्षण यात मूलभूत फरक आहे. जर लोकांच्या हितासाठी व त्या हिताच्या रक्षणासाठी शिक्षण द्यायचे असेल, तर ते शिक्षण सार्वजनिक पैशातूनच दिले गेले पाहिजे. जे शिक्षण सार्वजनिक पैसे खर्च करून दिले जात नाही ते सार्वत्रिक हिताचे असणे शक्यच नाही. याचा अर्थ असा नाही की, खाजगी शिक्षणसंस्थांवर बंदी घालावी; शिक्षणक्षेत्रावर सार्वजनिक शिक्षण संस्थांचा पगडा असला पाहिजे आणि खाजगी शिक्षणसंस्थांनी या व्यवस्थेशी जुळवून घेतले पाहिजे.

यांच्या नेमकी विरुद्ध परिस्थिती आपण जो पहिला दृष्टिकोण मांडला त्या अनुरोधाने विचार व व्यवस्था आपण रचत गेलो, तर मिळते. कारण, पहिला दृष्टिकोण शिक्षणाकडे शिक्षक व विद्यार्थी यांच्यात चाललेली देवाण-घेवाण म्हणून पाहतो आणि या देवाण-घेवाणीचे उद्दिष्ट असते ते विद्यार्थ्याला रोजगाराच्या बाजारात चांगला रोजगार मिळावा, हे. या विचाराशी खाजगी शिक्षणसंस्था पूर्णपणे सुसंगत ठरतात. जर शिक्षणाचे उद्दिष्ट नोकरी मिळवून देणे हेच असेल तर सार्वजनिक पैशाने अशा प्रकारची शिक्षणसंस्था चालवणे हा सार्वजनिक पैशाचा दुरुपयोग होईल आणि असा दुरूपयोग होण्यापेक्षा सडकून घेतलेल्या शुल्कावर शिक्षणसंस्था चालवणे हे योग्य होईल. एकदा का


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

शुल्काच्या रूपाने पैसा उभारून शिक्षणसंस्था चालवायची असे ठरले की, शुल्क भरणाऱ्या विद्यार्थ्यांच्या पसंतीनुरूप अभ्यासक्रम ठरविला पाहिजे, हे ओघानेच आले.

३

स्वातंत्र्य मिळाल्यापासून चाळीस वर्षापर्यंत तरी उच्च शिक्षण व्यवस्थेचा मोठा भाग सरकारी पैशांवर अवलंबून होता. याचा अर्थ असा की, आपले उच्च शिक्षणाविषयीचे धोरण आम्ही वर जो दुसरा दृष्टिकोण विवेचिला आहे तो स्वीकारून आखले जात होते. या धोरणावर टीका अशी होत असे की, जे पैसे प्राथमिक व माध्यमिक शिक्षणावर खर्च व्हावयास हवेत ते उच्च शिक्षणावर ओतले जात आहेत. उच्च शिक्षणाचा 'पांढरा हत्ती' पोसला जात आहे आणि शिक्षणाचा पाया असलेले जे प्राथमिक शिक्षण तिकडे दुर्लक्ष होत आहे.

तथापि ही टीका मुळातच चुकीच्या विचारावर आधारलेली आहे. प्राथमिक शिक्षण, साक्षरता या गोष्टी गरजेच्या खऱ्या; पण त्यावरील खर्चासाठी उच्च शिक्षणावरील खर्चावर नियंत्रणे ठेवली पाहिजेत, हे खरे नाही. यावर खरा उपाय एकूण शिक्षणावर होणारा खर्च वाढवणे हाच होय. खेदाची बाब ही आहे की, दक्षिण आफ्रिकेतील वर्णविद्वेषी गोरे सरकार दक्षिण आफ्रिकेच्या राष्ट्रीय उत्पन्नाचा जितका हिस्सा काळ्या प्रजेच्या शिक्षणावर खर्च करीत होते तितकाही हिस्सा भारत सरकारने स्वातंत्र्यानंतरच्या कोणत्याही वर्षी खर्च केला नाही! मुद्दा राजकीय इच्छा-शक्तीचा आहे. ती इच्छाशक्ती आपल्या सरकारकडे असती तर उच्च शिक्षणावरच्या खर्चाला कात्री न लावताही देशातील निरक्षरता सरकारला नाहीशी करता आली असती.

आता लोकांच्यात उच्च-शिक्षणाचे महत्त्व रुजू लागले आहे. अर्थव्यवस्था ही ज्ञानकेंद्री होणार, अशी 'हवा' आहे. 'राष्ट्रीय ज्ञान आयोगा'ने अशी शिफारस केली आहे की, इ. स. २०१५ पर्यंत देशातील विद्यापीठांची संख्या १५०० च्या घरात गेली पाहिजे. उत्कृष्ट दर्जाचे उच्च-शिक्षण पुरविणारी किमान ५० राष्ट्रीय विद्यापीठे स्थापिली पाहिजेत व त्यापैकी १० विद्यापीठे येत्या तीन वर्षात काम करू लागली पाहिजेत. थोडक्यात काय तर उच्च शिक्षणासाठी मोठ्या प्रमाणात निधी उपलब्ध होणार आहे.

पण त्यात एक मेख आहे. 'राष्ट्रीय ज्ञान आयोगा'ला अभिप्रेत असणारे उच्च शिक्षण आम्ही जो पहिला दृष्टिकोण सांगितला त्याला अनुसरून असणारे आहे. राष्ट्रीय ज्ञान आयोगाला विद्यापीठाची जी रचना योग्य वाटते ती अशी आहे. विद्यापीठाचे कुलगुरु एखाद्या उद्योगाच्या मुख्य कार्यकारी अधिकाऱ्याप्रमाणे (सीईओ) काम करतील. विद्यापीठाची अधिसभा (सीनेट) रद्द करण्यात येईल. विद्वत्परिषदे (ॲकॅडेमिक कौन्सिल) ऐवजी निरनिराळ्या कार्यकारी समित्या (स्टॅंडिंग कमिटीज्) निर्णय घेऊ लागतील. सारांश, प्रत्येक विद्यापीठ एखाद्या कार्यक्षम उद्योगाप्रमाणे काम करू लागेल. त्यातील निर्णयप्रक्रिया आजच्या सारखी लोकशाही पद्धतीची न राहता अधिकार-केंद्री राहील. बरे. अशा तऱ्हेचे हे ज्ञान निर्माण करणारे कारखाने सरकारी क्षेत्रात असणार नाहीत. यापैकी बहुतेक कारखाने खाजगी क्षेत्रात राहतील किंवा सरकारी + खाजगी अशा संयुक्त क्षेत्रात असतील. ही विद्यापीठे झटपट अस्तित्वात यावीत यासाठी विद्यापीठ अनुदान मंडळ निकालात काढण्यात यावे व त्याजागी एक 'नियंत्रक अधिकार मंडळ' नेमावे अशी देखील 'राष्ट्रीय ज्ञान आयोगा'ची शिफारस आहे.

राष्ट्रीय ज्ञान आयोगाने उच्च शिक्षणाविषयी जी योजना आखली आहे तिच्याबाबत आमचे तीन आक्षेप आहेत. आम्ही वर म्हटले आहे की, उच्चशिक्षणाचा मूळ उद्देश 'जैविक विचारवंत' निर्माण करून लोकांच्या स्वातंत्र्याचे रक्षण व्हावे, असा आहे. परंतु ज्ञान आयोगाने या उद्देशावर बोळा फिरविला आहे. ज्ञान आयोगाने ज्या १५०० विद्यापीठांचा प्रस्ताव मांडला आहे ती विद्यापीठे भारतीय व परदेशी उद्योगांसाठी कमी पगारावर काम करणारा व काही कौशल्ये आत्मसात केलेला नोकरवर्ग मात्र निर्माण करील. जगद्व्यापी उद्योग-व्यवस्था कशा तऱ्हेने चालते व लोकांवर त्या व्यवस्थेचे काय परिणाम होतात याचा समग्र विचार करणारे विचारवंत अशा विद्यापीठांपासून मिळणार नाहीत. थोडक्यात म्हणजे या विद्यापीठातून जगद्व्यापी भांडवलशाहीला उपयोगी असे









राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

"जैविक विचारवंत" बाहेर पडतील पण त्यांचा सामान्य जनतेला काही उपयोग असणार नाही. जगाला वेढून बसलेली भांडवलशाही आणि जनता यांचे हितसंबंध सारखेच आहेत असे मानणाऱ्यांनाच फक्त या येऊ घातलेल्या शिक्षणपद्धतीविषयी आपुलकी वाटेल.

'राष्ट्रीय ज्ञान आयोगा'(राज्ञाआ)च्या शिफारसी अशा आहेत, की ज्यांच्या योगे शिक्षकवर्गात वेतनाची विषमता निर्माण होईल. आजच शिक्षकांचा तुटवडा भासतो आहे व त्याचे कारण शिक्षकांचे वेतनमान कमी आहे, हे आहे. शिक्षकांचे वेतन व इतर व्यवसायात मिळणारी वेतने यातील तफावत तर छाती दडपून टाकणारी आहे. राज्ञाआच्या सूचना या तफावतींचा उल्लेखही करीत नाहीत. शिक्षणक्षेत्रात उत्तम दर्जाची माणसे यावीत यासाठी या आयोगाने सुचविले आहे की, "कामगिरीच्या आधारावर प्रोत्साहन आणि बक्षीस देण्यात यावे". याचाच अर्थ असा की, एकाच विद्यापीठात असंख्य वेतनश्रेणी देण्याची व्यवस्था करावी. याचा परिणाम असा होईल की, शिक्षकात 'एकमेळ' राहाणार नाही व जी थोडीफार लोकशाही निर्णय-प्रक्रिया आज शिल्लक उरली आहे तीही नष्टप्राय होईल.

तिसरे असे की, राज्ञाआला जे 'उत्कृष्ट' शिक्षण हवे आहे ते देण्यास वेतन-विषमतेने गांजलेली शिक्षण-व्यवस्था हमखास अयशस्वी ठरेल. अनेक विद्यापीठे, विद्यापीठ विभाग, शिक्षक आणि विद्यार्थी यांच्यावर अकार्यक्षमतेचा शिक्का बसेल व अशा पराभूत मनोवृत्तीमुळे त्यांच्यात जी गुणवत्ता मुळात असेल तीही नाहीशी होईल. उलट, अशी मोजकी विद्यापीठे आणि शिक्षक उरतील की ज्यांना उत्कृष्ट लेखले जाईल. हे शिक्षक व विद्यापीठे म्हणजे युरोपीय व अमेरिकी विद्यापीठे व शिक्षक यांच्या केवळ प्रतिकृती मात्र असतील. यांच्यातही एक घुसमटलेपण असेल; ते अशासाठी की, नकली प्रतिकृतीपासून सुटका करून घेऊन मूळ विद्यापीठांकडे जाण्याची दारुण मनीषा बाळगून ते काम करीत राहातील. आपण हे लक्षात ठेवले पाहिजे की, परक्यांचे अनुकरण केल्याने गुणवत्ता निर्माण होत नाही. आपल्याकडील नाव-लौकीक मिळवलेल्या शिक्षण-संस्थांची कीर्ती त्यांनी भारतीयत्व सांभाळून गुणवत्ता अंगात बाळगली यामुळे झालेली आहे. काही लोक आय्. आय्. टी. व आय्. आय्. एम्. यांची उदाहरणे घेऊन आमच्या विवेचनाला विरोध करतील. पण आमचे हे स्पष्ट मत आहे की, आय्. आय्. टी व आय्. आय्. एम्. यांचा आदर्श मानून त्या धर्तीवर जर आपण समग्र शिक्षण व्यवस्थेची उभारणी केली तर ते एक संकटच ठरेल.

४

आतापर्यंत आम्ही जे लिहिले आहे त्यावरून असा समज होईल की, आपली उच्च शिक्षण व्यवस्था गुणवत्तापूर्ण असून कोणत्याही उद्रेकापासून मुक्त आहे; किंवा आपल्याला उत्कृष्टतेसाठी प्रयत्न करण्याची गरज नाही. पण आम्हास तसे सुचवायचे नाही. आमचे म्हणणे असे आहे की, गुणवत्ता म्हणजे काय व ती कशी प्राप्त करून घ्यावयाची या गोष्टी आमच्या आम्ही ठरवावयाच्या आहेत. 'उत्कृष्ट' म्हणजे काय याची आमची स्वतःची अशी समज असली पाहिजे. उच्च शिक्षणाची दुरवस्था सुधारायची असेल, तर सरकारने उच्च शिक्षणाबद्दलची अधिक जबाबदारी उचलली पाहिजे. ज्या 'स्वयंनिधिनिर्भर' (सेल्फ फायनान्सिंग) शिक्षण संस्था आहेत त्यांच्यावर समाजाचे नियंत्रण असायला हवे. शिक्षकांचे पगार व सेवाशर्ती यात सुधारणा केली पाहिजे, संशोधनाला प्राधान्य व प्रोत्साहन दिले पाहिजे. शैक्षणिक दुरवस्थेचा अधिक तपशिलवार अभ्यास करून उपाय-योजना केली पाहिजे. केवळ नवीन व प्रतिष्ठित शिक्षण-संस्था उभ्या करण्याने चालू दुरवस्था संपणारी नाही.

हे मान्य केले पाहिजे, की 'राज्ञाआ'ने वस्तुस्थितीच्या काही अंगांचे परिशीलन नक्कीच केले आहे. जागतिक भांडवलशाहीला भारतातून निर्माण झालेल्या कुशल कामगारांची गरज आहे व त्यामुळे भारतातील मध्यम वर्गीय युवकांना भरघोस संधी जगाच्या रोजगार-बाजारात उपलब्ध होत आहेत. साहजिकच मध्यम वर्गीय युवकांचा असा आग्रह आहे की, ज्यामुळे या संधींचा फायदा घेता येईल अशा प्रकारचे शिक्षण उच्च-शिक्षण-व्यवस्थेकडून मिळाले पाहिजे. समजा, अधिकृत शिक्षण-


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत
नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष
द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

व्यवस्था असे शिक्षण देणार नसेल तर अनधिकृतपणे असे शिक्षण देणाऱ्या खाजगी शिक्षणसंस्था ते काम करण्यास पुढे येतील. दुसरे असे की, जागतिक बाजारपेठेचे आकर्षण वाटावे यात गैर ते काय आहे? शिक्षण व्यवस्थेत बदल होणार नसतील तर ह्याचा अर्थ ही शिक्षणव्यवस्था तरुणांना मिळणाऱ्या संधींच्या मार्गात अडथळा होऊन बसते आहे, असा होईल. थोडक्यात सांगायचे तर आम्ही जो दुसरा दृष्टिकोण मांडला आहे तो अव्यवहार्य आणि अस्वीकार्य आहे कारण त्यामुळे अनेक जणांसाठी येऊ घातलेली रोजगाराची संधी हिरावून घेतली जाणार आहे. आपल्या स्वातंत्र्य लढ्यात हा दुसरा दृष्टिकोण कदाचित उपयोगी पडला असेल; पण त्यासाठी त्याला कायमचे कवटाळून बसावे असे काही नाही.

या युक्तिवादाला दोन प्रकारे उत्तर देता येईल. पहिला भाग असा की, आपण जर एकटवलेले राष्ट्र असू तर आपली पहिली गरज राष्ट्राच्या उभारणीची असली पाहिजे; आपल्याला आपल्या गरीब जनतेचे हितरक्षण केले पाहिजे; त्यांच्या दुःस्थितीपासून त्यांची मुक्तता कशी होईल, त्यांचे स्वातंत्र्य कसे अबाधित राहील याचा ध्यास आपण धरला पाहिजे. यासाठीच आम्ही जो दुसरा दृष्टिकोण सांगितला त्याचा अंगीकार आपण केला पाहिजे. देशी-परदेशी भांडवलशाहीच्या व मूठभर असणाऱ्या मध्यमवर्गीय महत्त्वाकांक्षी तरुणांच्या दडपणाला बळी पडून आपण आपल्या उच्च-शिक्षण-व्यवस्थेचा बळी देऊन चालणार नाही. आपण हे स्पष्टपणे समजून घेतले पाहिजे की, हा मध्यमवर्गीय तरुण वर्ग आणि देशातील आम जनता यांचे हितसंबंध परस्परविरोधी आहेत.

पण याहून महत्त्वाचा मुद्दा हा की, "जैविक विचारवंत" घडविणारे उच्च शिक्षण जागतिक भांडवलशाहीला उपयोगी असा कुशल नोकरवर्ग घडवू शकत नाही, हे मानणे चुकीचे आहे. अखेर जगातील भांडवलशाही आपल्या कुशल कामगारांना नोकरी देते ते काही भूतदयेपोटी नाही; तर त्यात भांडवलशाहीचा फायदा आहे म्हणून. हा फायदा होत आहे अशी जोपर्यंत त्या भांडवलशाहीला खात्री वाटत आहे तोपर्यंत ती भांडवलशाही असे तरुण मिळवीत राहीलच. त्यासाठी आम्ही आमच्या शिक्षण व्यवस्थेत आमूलाग्र बदल करावेत असे नाही.

थोडक्यात म्हणजे नालासाठी घोडा गमवावा अशी स्थिती नाही. भांडवलशाहीला उपयोगी असा कामगारवर्ग तयार करण्यासाठी आम्ही आमची शिक्षण-व्यवस्था मोडीत काढावी हे योग्य नाही. आपल्या मध्यमवर्गीय तरुणांच्या आकांक्षा सर्वांच्या माथी मारून आपल्या जनतेसाठीचे "जैविक विचारवंत" निर्माण करणारी आमची शिक्षणपद्धती निकालात काढून "भांडवलशाहीचे 'जैविक विचारवंत'" निर्माण करणारी शिक्षणपद्धती इथे स्थापन करावी ही विपरीत गोष्ट होईल. आज शिक्षणव्यवस्थेस प्राप्त झालेली दुरवस्था दूर करण्याचे, आम्ही सांगितलेल्या दुसऱ्या दृष्टिकोणाशी सुसंगत असे, मार्ग आहेत त्यांचा अवलंब केला पाहिजे.

(आधारित)

✠✠✠

टीप

१. **जैविक विचारवंत** (ऑर्‌गॅनिक इंटलेक्चुअल्स्)

ग्रामशीने 'पारंपरिक विचारवंत' व 'जैविक विचारवंत' असे विचारवंतांचे दोन गट पाडले होते. पारंपरिक विचारवंत म्हणजे एखाद्या समाजातील परंपरेने चालत आलेला सुशिक्षित वर्ग. या उलट "जैविक विचारवंत" म्हणजे समाजातील वेगवेगळ्या वर्गात असणारा विचार करणाऱ्यांचा गट उदा. मजूरांच्या वर्गातून त्यांच्या परिस्थितीचा सामग्र्याने, म्हणजे वर्ग म्हणून, विचार करणारा एक गट निर्माण होतो. त्याला मजूर वर्गातून जैविक प्रक्रियेने निर्माण झालेला विचारवंतांचा गट म्हणून ओळखले जाईल.

✠✠✠

अनुक्रमणिका








## पत्रव्यवहार

मा. संपादक, नवभारत मासिक,

स.न.वि.वि.

आपल्या जानेवारी २००८ च्या अंकात 'लोकमान्य ते महात्मा'च्या निमित्ताने चा पहिला लेखांक वाचला. 'लोतेम'ची लोकप्रियता पुरस्कार, चर्चा इ. निमित्ताने वाढत असतानाच प्रथम सा. साधनामधील गोविंद तळवलकरांचे लेख वाचनात आले अन् त्याला प्रा. मोरे यांची उत्तरही वाचले होते. त्यामुळे तळवलकर पक्ष आणि मोरे पक्ष निर्माण झाल्याचे वाचकांच्या प्रतिक्रियांवरून जाणवले होते.

आता 'नवभारता'त भावे लिहीत आहेत. जीर्णोद्धार लेखमालेमुळे प्रा. भावे यांच्या भाषेचा चिकित्सेचा परिचय 'नवभारत'च्या वाचकांना आहे. प्रा. मोरे यांचेप्रमाणे प्रा. भावे यांचेही वाचन जबरदस्त आहे. त्यामुळे आम्हा वाचकांना नवी उत्तरे-प्रत्युत्तरे पहावयास मिळणार. वाचकांचे प्रबोधनासाठी तो उपयुक्त ठरावा.

१. बॅ. जयकरांच्या कुलगुरूपदी नेमणुकी-विषयी स्वतः जयकरांनी काही लिहिले असेल. त्यांच्या इंग्रजी आत्मचरित्राचा तिसरा भाग अद्याप पुढे आला नाही. राष्ट्रीय अभिलेखागारात तो भाग आहे. (जाता जाता-विद्यमान कुलगुरू, पुणे विद्यापीठ यांनी त्या भागाच्या प्रकाशनाचे श्रेय अवश्य मिळवावे.) कुलगुरू होण्याची अपूर्वाई वाटणारे अनेक जण आहेत ही झाली आजची गोष्ट.

२. ना. ग. गोरे - नानासाहेबांनी १९४८ च्या लेखाबद्दल १९५७ च्या निवडणुकीच्या वेळी पत्रक काढून खेद व्यक्त केला हे निदान मला तरी नव्याने समजले. ते पत्रक आता उपलब्ध होणे कठीणच. केवळ निवडणुकीची गरज म्हणून ते पत्रक असण्याची शक्यता कमी. आणि म्हणूनच पत्रकाचे कारण समजून घेणे महत्त्वाचे वाटते. पत्रकाची भाषा आणि आशय निश्चित तितक्याच महत्वाचा असेल.

श्री. श्रीधर विश्वनाथ सहस्रबुद्धे
रश्मी हौ. सोसायटी, सिंहगड रस्ता, पुणे - ३०.

✠✠✠

प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमाला, वाई

**हिंदुधर्माची समीक्षा** (चौथी आवृत्ती)

**आणि**

**सर्वधर्मसमीक्षा** (दुसरी आवृत्ती)

**तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी**

पृष्ठे २९५ किंमत रू. २२५/-

**संपर्क : चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी, वाई (जि.सातारा)**

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

## लेखकांचा परिचय

 **प्रा. सदानंद मोरे**

तत्त्वज्ञान विभाग प्रमुख, पुणे विद्यापीठ, संत ज्ञानदेव अध्यासनाचे प्राध्यापक; मराठी संस्कृतीचे व समाजव्यवहाराचे अभ्यासक. The Geeta : A Theory of Human Action, Krishna : The Man and His Mission, तुकारामदर्शन, त्रयोदशी आणि अनेक ग्रंथांचे कर्ते.

***पत्ता :*** ७ सिद्धान्त अपार्टमेंट, ३१२, ए-९, शनिवार पेठ, पुणे ४११ ०३०.

 **प्रा. श्री. मा. भावे**

माजी प्रपाठक व विभाग प्रमुख, गणित विभाग, नौरोजी वाडिया कॉलेज, पुणे; गणित व तत्त्वज्ञान या विषयांत पी.एच्.डी. व पदवीत्त्युर संशोधन; शिक्षक चळवळीत सहभाग; शिक्षण, गणित व तत्त्वज्ञान विषयावर २५ शोधनिबंध प्रसिद्ध.

***पत्ता :*** ३३/२०, ४ थी गल्ली, प्रभात रोड, पुणे – ४११ ००४.

 **प्रा. म. अ. मेहेंदळे**

माजी प्राध्यापक, संस्कृत विभाग व माजी सहयोगी प्रमुख संपादक, संस्कृत कोश विभाग, डेक्कन कॉलेज, पुणे; संपादक, महाभारताचा सांस्कृतिक कोश, भांडारकर प्राच्य विद्या संशोधन मंदिर, पुणे. वैदिक वाङ्मयातील प्रश्नोत्तरे (१९८०), भारतीय द्यूत (१९९०), पू. विनोबा-कृत ऋग्वेद-सारचे मराठी भाषांतर (१९८२), जरथुश्त्राच्या गाथांचे मराठी भाषांतर (१९९४), या ग्रंथांचे लेखक; नवभारतात लेखन.

***पत्ता :*** बी-४, प्रबोधन हाऊसिंग सोसायटी, ६१ ए/९-१०, कर्वे रोड, एरंडवणे, पुणे ४११ ००४.

 **प्रा. सुधीर रसाळ**

डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठामध्ये (औरंगाबाद) मराठी विषयाचे नामवंत (निवृत्त) प्राध्यापक; ज्येष्ठ समीक्षक; अ. भा. साहित्य महामंडळाचे भूतपूर्व अध्यक्ष; कविता आणि प्रतिमा व अन्य समीक्षा ग्रंथ; 'नवभारत' मासिकाचे सहाय्यक संपादक.

***पत्ता :*** १००, श्रेयनगर, नवा उस्मानपुरा, औरंगाबाद.

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

रजिस्टर. क्र. **11697/57**


आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

## प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

**सुधारित किंमत**
**२० नोव्हेंबर २००६**
**पासून लागू**

- ❑ वैदिक संस्कृतीचा विकास (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी
- ❑ अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती — ३०० रु.
- ❑ पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास । डॉ. सुमंत मुरंजन — २०० रु.
- ❑ हिंदी साहित्यविचार । प्रा. प्यारेलाल गोहेल — १२० रु.
- ❑ श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदन ग्रंथ — २५ रु.
- ❑ संशोधन साधना । डॉ. वसंत स. जोशी — ६० रु.
- ❑ तरंगयामिक व पुंजयामिक । मा. ग. टोळे — ६० रु.
- ❑ आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास । ऋग्वेदी — २० रु.
- ❑ वागीश्वरी । डॉ. गो. के. भट — १५० रु.
- ❑ प्रस्थानभेद (प्राचीन १४ विद्यांची माहिती) पुनर्मुद्रण । गं. वा. लेले — ६० रु.
- ❑ गिर्यारोहण परिचय । अच्युत खोडवे — ५० रु.
- ❑ इतिहासाचे तत्त्वज्ञान (दुसरी आवृत्ती) । सदाशिव आठवले — ४० रु.
- ❑ दासशूद्रांची गुलामगिरी (भाग २) । शरद पाटील — १३० रु.
- ❑ शाहीर हैबती । डॉ. शिवाजीराव चव्हाण — १५० रु.
- ❑ गीताचिकित्सा । भाऊ धर्माधिकारी — ४० रु.
- ❑ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी (चरित्र) । सौ. मालती देशपांडे — १४० रु.
- ❑ बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार । प. ल. वैद्य — २५ रु.
- ❑ हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन (संवर्धित दुसरी आवृत्ती) । मे. पुं. रेगे — ५० रु.
- ❑ पाच पुस्तक-परीक्षणे । वा. म. कुलकर्णी — १६० रु.
- ❑ भेदविलोपन : एक आकलन । अशोक केळकर — ६० रु.
- ❑ कॉलिंगवुडची कलामीमांसा - एक भाष्य । रा. भा. पाटणकर — ३० रु.
- ❑ धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार । दि.के. बेडेकर — १०० रु.
- ❑ आचार्य शं. द. जावडेकर : व्यक्तित्त्व आणि विचार — ३० रु.
- ❑ तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार — १०० रु.
- ❑ इहवाद आणि सर्वधर्मसमभाव । मे. पुं. रेगे — १५० रु.
- ❑ प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा — १२० रु.
- ❑ चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले — २०० रु.
- ❑ विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर — १०० रु.
- ❑ नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन । द.ना. धनागरे — १२० रु.
- ❑ प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती (निवडक मौलिक लेखांचा संग्रह) । डॉ. म. अ. मेहेंदळे — ४० रु.
- ❑ हिंदुधर्माची समीक्षा आणि सर्वधर्मसमीक्षा (दुसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी — ५५० रु.
- ❑ पाश्चात्त्य नीतिशास्त्राचा इतिहास (दुसरी आवृत्ती) । प्रा. मे. पुं. रेगे — २२५ रु.

१६० रु.

१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही.पी. ची पद्धत नाही.
३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.

*संपर्कासाठी पत्ता* : **चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा)**


हे मासिक घ.वा. जोशी यांनी अक्षरसाहित्य, ३५, गुरुकृपा सो., शाहूनगर, गोडोली, सातारा ४१५००१ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई